# झुंज

(तीन-अंकी नाटक)

लेखक

अनन्त काणेकर



प्रकाशन क्रमांक १०२

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबई ४

मूल्य दोन रुपये

प्रकाशक
ग. पां. परचुरे
ग. पा. परचुरे प्रकाशन मन्दिर
गोरेगावकर चाळ क्र. २
गिरगांव, मुम्बअी ४

प्रथमावृत्ति
२१-४-५४

मुखपृष्ठ सजावट
चित्रकार गोडसे

मुद्रक
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबअी ४

जॉन गॉल्सवर्दीच्या 'स्ट्राइक्' नाटकाचें 'झुंज' हें रूपान्तर आहे. चौदापधरा वर्षांपूर्वींच यांतला एक प्रवेश माझ्या 'धूर व इतर एकांकिका' या सग्रहात प्रसिद्ध झाला होता. माझ्याकडून नाटक पुरें करून घेण्याचें सर्व श्रेय मुंबई मराठी साहित्य संघाचे डॉ. भालेराव याना आहे.

**अनंत काणेकर**

‘झुंज’ नाटकाचा पहिला प्रयोग दिनांक २१ एप्रिल १९५४ बुधवारीं रात्रौ ८॥ वाजतां मुंबई येथें नाट्योत्सवाच्या मंडपांत मुंबई मराठी साहित्य संघाच्या नाट्यशाखेच्या वतीनें करण्यांत आला. या प्रयोगांत पुढील कलावन्तानी भूमिका केल्या होत्या.

| | |
|---|---|
| **बाबासाहेब सुभेदार** (सुभेदार शुगर वर्क्स, सुभेदारवाडी, या कंपनीचे संस्थापक आणि बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचे चेअरमन्) | **मामा पडसे** |
| **दिवाकर सुभेदार** (त्याचा मुलगा) | **राम भटसावळे** |
| **बापूसाहेब धुमाळ** | **गजानन कर्वे** |
| **हणमंतराव वाठारकर** | **अनंत वर्तक** |
| **हिरालाल शेट** (बोर्डाचे इतर डायरेक्टर) | **रमाकांत लाड** |
| **कुळकर्णी** (कंपनीचे सेक्रेटरी) | **गोरख वासुदेव** |
| **देशमुख** (कंपनीचे मॅनेजर, बाबा-साहेबाचे जावई) | **बळवंत पाठारे** |
| **माने** (अखिल महाराष्ट्र साखर कामगार फेडरेशनचे सरचिटणीस) | **रामचंद्र वर्दे** |
| **जाधव** | **अमर शेख** |
| **सावले** | **नरहरि हिंदळेकर** |
| **साटम** | **नंद गावसकर** |
| **जावजी मास्तर** | **लक्ष्मण साटे** |
| **शिवराम पवार** (कामगाराच्या संपसमितीचे सभासद) | **वासुदेव नारकर** |

| | |
|---|---|
| राजा पवार | राजा पटवर्धन |
| गणू तांबट | राजा फडके |
| साखळकर | भास्कर मुणगेकर |
| यल्लाप्पा | बापू जोशी |
| विठ्या लोहार | नारायण नागोटकर |
| लखू | राघू कदम |
| (संपकाले कामगार) | |
| बाबाजी (बाळासाहेबाचा जुना नोकर) | व. ना. एरडे |
| दया देशमुख (बाबासाहेबाची मुलगी, मॅनेजर देशमुखाची बायको) | रोहिणी कर्वे |
| गिरिजा (जाधवाची बायको) | सुमन मराठे |
| गीता (जावजी मास्तराची मुलगी, शिवराम पवाराची बायको.) | इंदुमती घोटीकर |
| पवारीण आजी (शिवराम आणि राजा पवाराची आई) | मगला टिपणीस |
| साटमीण (साटमची बायको) | कुदा |
| साखळकरीण (साखळकराची बायको) | मालती |
| बारक्या (शिवराम पवाराचा नऊ वर्षांचा भाचा) | कुमार पेढारकर |

इतर संपवाले, गांवकरी वगैरे

दिग्दर्शक :

**केशवराव दाते**

# १

[ मॅनेजर देशमुखाच्या बंगल्यातला दिवाणखाना  सकाळची दहा साडे-दहाची वेळ आहे  सातआठ माणसें भोंवती बसू शकतील असे एक लांबट टेबल मुद्दाम दिवाणखान्यात आणून ठेवलेलें दिसतें  टेबलाशी खुर्च्या वगैरे इतर व्यवस्था आहे  सुभेदारवाडा शुगर वर्क्सच्या बोर्ड ऑफ् डायरेक्टर्सची सभा सुरू व्हावयाची आहे  बोर्ड आफ डायरेक्टर्सचे चेअरमन् बाबासाहेब सुभेदार त्यांच्यासाठी खास ठेवलेल्या एका प्रशस्त खुर्चीवर बसलेले दिसतात  दिवाकर सुभेदार, धुमाळ, वाठारकर, हिरालाल वगैरे इतर डायरेक्टर, कंपनीचे मॅनेजर देशमुख, सेक्रेटरी कुळकर्णी यांच्यापैकीं काही बसलेले आहेत तर काही बसण्याच्या तयारीत आहेत ]

**धुमाळ** : हुश्श ! ही हवा आहे की काय आहे ? सर्व बाजूनी आग पेटल्यासारखं झालय् ! कुळकर्णी, काहीं टेबलफॅन वगैरे आहे की नाहीं ?

**वाठारकर** : खरच, एखादा टेबलफॅन तरी आणा.

**कुळकर्णी** : पाहतो ह साहेब—(मॅनेजराच्या तोडाकडे पाहतो.) मॅनेजर-साहेबांना कदाचित्—

**वाठारकर :** हें तुमच गाव आहे कीं आगीची भट्टी आहे, देशमुख ?

**देशमुख :** आज झाली आहे खरी भट्टी सुभेदारवाडीची, वाठारकरसाहेब, पण हवेंतच आग आहे असं थोडच आहे ? कुठ डोकीं भडकलींत, तर कुठ पोटात भुकेचे डोंब उठलेत ! पाहतों ह एखादा टेबलफॅन. (आत जातात.)

**धुमाळ .** म्हणजे !—कामगाराची अन्नान्नदशा झालीय्, त्याला आम्ही जबाबदार आहोत अस देशमुखाना म्हणायचय् कीं काय ?

**वाठारकर :** मघाशीं काहीं कामगाराची पोर पाहिली मीं,—बघवेना आपल्याच्यान बुवा !

**धुमाळ :** पण आपण काय करणार त्याला ? आपल्याच्च आईबापाच्या कर्माची फळ भोगताहेत ती !

**दिवाकर :** (हातातल वर्तमानपत्र पुढ करून) हा 'समाचार' काय म्हणतोय पाहा—सुभेदारवाडींत भूकबळी !

**धुमाळ :** चुलींत घाला तो 'समाचार'! त्याच्च लायकीच आहे ते पत्र. त्याच्या त्या सपादकाला गोळी घालून ठार केला पाहिजे—

**दिवाकर :** पुढें ऐका काय लिहलय् ते. (वाचू लागतो.) मुबई-पुण्यात आपल्या बंगल्यातल्या गाद्यागिरद्यावर लोळणारे 'सुभेदार शुगर वर्क्स'चे मेहरबान डायरेक्टर लोक सुभेदारवाडीला यायची एखादे दिवशीं तसदी घेतील तर या विनाकारण लाबलेल्या सपामुळे कामगाराचे काय हाल चाललेत—

**धुमाळ :** आलोत कीं आज तसदी घेऊन !

**दिवाकर :** (पुढें वाचतो) ते पाहून त्याची उलटी काळजंसुद्धा विरघळल्याशिवाय राहणार नाहींत—

(हिरालाल दिवाकराच्या हातातलें वर्तमानपत्र घेतात )

**धुमाळ :** एक नबरचा हलकट माणूस आहे तो सपादक ! काहीं वर्षापूर्वी जाहिरातींची भिक्षा मागत फिरत असे, तेव्हापासून पाहतोय् मी त्याला—पैसे उकळायला काय वाटेल ते करील तो क्षुद्र कीटक !

(बाबासाहेब काहींसें पुटपुटतात, पण तें नीटसें ऐकू येत नाही.)

**धुमाळ** : काय म्हणताहेत बाबासाहेब, दिवाकर ?

**दिवाकर** : बाबासाहेब म्हणताहेत, पैशाच्या लोभान वाटेल ते करणारे पुष्कळच कीटक असतात !

( धुमाळ 'ह' म्हणून वाठारकरांच्या जवळ जाऊन बसतात )

**वाठारकर** : सापडतोय् कीं नाही टेबलफॅन देशमुखाना ? मी तर वितळून जातोय् कीं काय, असं मला वाटायला लागलय !

(देशमुख आणि दया एक टेबलफॅन घेऊन येतात )

**दया** : अं ह—तिकडे नको—या कोपऱ्यात ठेवा—ह—आता ठीक झाल कीं नाहीं, धुमाळसाहेब ?

**धुमाळ** : उत्तम !

**वाठारकर** : देव तुमच कल्याण करो, दयाबाई !

**दया** : हे काय बोलता वाठारकरसाहेब ! (बाबासाहेबाना) बाबा, तुम्हाला काहीं सरबत वगैरे ? (बाबासाहेब 'नको' म्हणून मान हलवतात.) तुला, दिवाकर ?

**दिवाकर** : नको—नुक्तच चहापाणी झालय् आम्हा सर्वाच. हो—हो—एखाद फौंटनपेन् पाठवून दे बाहेर—सभा सुरू झाली कीं लागेल.

**दया** : वाठारकरसाहेब बसलेत तिथ त्या—त्या टेबलात पेन आहे पाहा.

**वाठारकर** : (टेबलाचा खण उघडून पेन बाहेर काढतात.) नवीन पार्कर दिसतय्. (तिला खूष करण्याच्या उद्देशान) देशमुखाना नवीन नवीन पेनाची आवड दिसते !

**देशमुख** : छट् !—मुळींच नाहीं. तिच आहे ते पेन्. आपल्याला टाक आणि दौतच बरी वाटते—

**वाठारकर** : खरच. कामाच्या दृष्टीनं दौतटाकासारख सुख नाहीं !

**देशमुख** : बरोबर आहे.—दया, जेवण वेळेवर पाहिजे ह. बहुतेकाना साडे-सातच्या गाडीन मुबईला जायचय्—

**दया** : त्याची काहीं काळजी करू नका. तुमची सभा सपायच्या आत जेवण तयार—तुम्हीच सभा लांबवून उशीर कराल ! (ती आत जाते.)

**वाटारकर** : रात्रीच गेस्टहौसमधल जेवण भयंकर होत बुवा! पोळ्या त पुरल्या भाजलेल्यासुद्धा नव्हत्या !

**धुमाळ** : साडेदहा वाजले—कुळकर्णी, मिनिटबुक वगैरे तयार आहे ना? सभेला सुरुवात करावी हें बर.

**कुळकर्णी** : (बाबासाहेबाच्या तोंडाकडे होकारासाठीं पाहतो. बाबासाहेब मानेने होकार देतात. मिनिट वाचू लागतो—)"ता. ३१ जानेवारी १९५२ रोजी दुपारी चार वाजता कपनीच्या मुबईतील हेडऑफिसात झालेल्या डायरेक्टर बोर्डाच्या सभेला पुढील डायरेक्टर हजर होते : श्री. बापुसाहेब धुमाळ, श्री. हणमतराव वाटारकर, श्री. हिरालालशेट, श्री दिवाकर सुभेदार. अध्यक्षस्थानीं बोर्डाचे चेअरमन् श्री. बाबासाहेब सुभेदार होते. कपनीच्या मालकीच्या सुभेदारवाडी येथील सुभेदार शुगर वर्क्समध्यें चालू असलेल्या सपाबाबत तिथल्या मॅनेजरसाहेबाकडून आलेली ता. २१, २४, २६, २९ जानेवारींची चारहि पत्रें सभेत वाचून दाखविण्यात आली. साखर कामगार फेडरेशनचे चिटणीस श्री. माने याची बोर्डाशी मुलाखत ठरविण्यासबधीचें पत्र वाचून दाखविण्यात आले. सपवाल्याच्या समितीतर्फे श्री. जगदेव जाधव, श्री. जावजीमास्तर, श्री. सावळे, श्री. साटम आणि श्री. पवार याच्या सह्याचे बोर्डाशी बोलणी करण्यासबधीचें पत्र वाचण्यात आले. या सर्व पत्राच्या वाचनानतर थोडी चर्चा होऊन बोर्डाची एक खास सभा ता. ७ फेब्रुवारी १९५२ रोजी सुभेदारवाडी येथे मॅनेजर देशमुख याच्याच बगल्यावर घ्यावी आणि तेथेच बोर्डाला भेटण्यासाठी सपवाल्याच्या समितीला आणि फेडरेशनचे श्री. माने याना बोलवावें, असा ठराव एकमताने पास झाला. नव्या शेअर सर्टिफिकेटावर चेअरमनसाहेबाच्या सह्या व्हावयाच्या होत्या त्या झाल्यानतर सभा सपली" (मिनिटबुक अध्यक्षाच्या पुढें ठेवतो.)

**बाबासाहेब** : सर्व ठीक आहे अस समजतो?—अं? (सही करतात.)

**हिरालाल** : फेडरेशनचा काय बर डाव असावा? सपाचा पाठिंबा तर त्यानीं काढून घेतलाय्. मग मान्याला आमची मुलाखत कशाला हवीय? तुमची काहीं कल्पना चालते का, कुळकर्णी?

**कुळकर्णी** : आपण अजूनहि काही तडजोडीला तयार होऊ अस त्याला

वाटत असल पाहिजे. सपाचा पाठिंबा अधिकृत रीत्या काढून घेतलेला असला तरी कामगाराच्या हितासाठी फेडरेशन काहीं ना काहीं प्रयत्न करीत राहणारच. आपल्या कामगाराशी आज दुपारी माने बोलणारच आहे.

**धुमाळ** : त्या मानेवर माझा मुळीच विश्वास नाहीं. कोणत्याहि परिस्थितीत मोजून मापून शब्द बोलणारा मोठा वस्ताद माणूस आहे तो. असल्या माणसाची मला कधीच खात्री वाटत नाही. त्याच्याशी बोलणीं करण्याकरिता मुद्दाम इथ येण्यात आपली चूक तर झाली नाही ना अस सारख राहून राहून मला वाटतय्. (वळून) कामगाराच्या सपसमितीला किती वाजता बोलावलय् तुम्ही, देशमुख ?

**देमुशख** : झालीच वेळ आता—अकराची वेळ दिली होती मी.

**धुमाळ** : वेळ होऊ द्या. ते आले तरी आपल काय ते निश्चित ठरेपर्यंत आत कोण बोलावतय् त्याना. बसू द्या व्हराड्यात हवा खात !

**देशमुख** : गेला महिना दीड महिना ते आणि त्याची बायकापोर हवा खाऊनच जगताहेत बिचारीं !

**वाठारकर** : बिचारे ! हवाहि अशी पेटलेली—

**धुमाळ** : तुम्हाआम्हाला काय करायचय् ते काय खाताहेत त्याच्याशीं ? काहीं झाल तरी आपल इथल काम मात्र आज सहाच्या आत सपलच पाहिजे. संध्याकाळची साडेसातची गाडी मला मिळालीच पाहिजे. आमच्या कुटुंबाची प्रकृति ठीक नाहीं. तिला हवेसाठी उद्याच्या गाडीन पाचगणीला न्यायचय् (मान उडवून) आमच्या वडिलाच्या काळीं संपबिप असल्या भानगडी काहीं नव्हत्या बुवा. आमच्या उसाच्या मळ्यात त्या काळींसुद्धा शें-दोनशे माणसं कामाला असत—

**हिरालाल** : ओहो !—म्हणजे उसाशी तुमचा सबध खूपच जुना दिसतो—

**धुमाळ** : त्या काळात सप म्हणजे गडी बिथरले कीं कुऱ्हाडी घेऊन मालकाच्या घरावर धावायचे आणि मालक बदुका घेऊन बाहेर पडायचे—तडकाफडकीं निकाल ! सहा सहा महिने गडी आणि मालक दोघेहि रखडताहेत असली अलीकडच्यासारखी भानगड नाही—

**वाठारकर** : बापरे ! मालकाच्या अंगावर कुऱ्हाडी घेऊन गडी धावायचे ?

**धुमाळ** : हो, हो !—धावायचे म्हणजे ..पण मालक काहीं कमी नव्हते ! ते पुढ यायच्या आत बदुकीन मुडदाच पाडायचे. आमच्या वडिलानीं एकदा दोघाना लोळवल होत.

**वाठारकर** : (भेदरून) म्हणजे दोघाना ठार केल ?

**धुमाळ** : एक ठार झाला. एकाचा पाय जायबदी झाला.

**बाबासाहेब** : (हातातले कागद दाखवीत) ह, सभा सुरू झालीय्. आजच्या सभेपुढल काम—चाल् सपाबाबत डायरेक्टर बोर्डान आपल धोरण निश्चित करण. प्रत्येकान आपापल म्हणण थोडक्यात सागावं.

[ कित्येक क्षण स्तब्धता ]

**धुमाळ** : हा संप म्हणजे तिहेरी लढा झालाय् आमचे कामगार आणि आम्हीच असतों म्हणजे पाहून घेतल असत काय तें. पण अखिल महाराष्ट्र साखर कामगार फेडरेशन मध्यें लुडबूड करतच आहे.

**हिरालाल** : फेडरेशनला विचारतो कोण ?

**धुमाळ** : विचारतो कोण म्हणून कस चालेल ? त्याना दाराशी उभ करू नये अस आपल्याला वाटल तरी त्याना विचारण प्राप्तच आहे. आपल्याच कारखान्यातले नव्हे तर साऱ्या साखरधद्यातले कामगार फेडरेशनमध्यें आहेत. पण या फेडरेशनवाल्याच्या एका गोष्टीच मला राहून राहून आश्चर्य वाटत. आमच्या कामगाराच्या सपाला अधिकृत पाठिंबा द्यायच फेडरेशन नाकारतय्. पण चिटणीस माने मात्र कामगाराच्या बाजून तड-जोडीसाठी धावाधाव करतोच आहे.

**दिवाकर** : या मुद्द्याचा पुरेसा काथ्याकूट झाला—पुन्हा तीच चर्चा नको.

**धुमाळ** : नको कशी ? माने आज येणार आहे कीं आपल्या भेटीला. भट्टीखात्यातल्या कामगाराच्या मागण्या आपल्यालाहि भरमसाट वाटतात, म्हणून आपण संपाला अधिकृत पाठिंबा देत नाहीं असं फेडरेशन म्हणत. पण तडजोडीसाठी मान्याची आटापीट चाललीच आहे.

**देशमुख** : चालणारच. कामगाराची बाजू फेडरेशन कशी कधीं सोडील ? अधिकृत पाठिंबा एवढ्याचकरिता नाहीं, कीं मग सगळ्याच साखर कारखान्यातल्या भट्टी कामगाराना आमचे कामगार मागताहेत तेवढ्या

पगाराची मागणी करावी लागेल. ती मागणी कोणताहि कारखाना मान्य करणार नाहीं आणि मग फेडरेशनला सर्वच कामगाराचा सार्वत्रिक संप पुकारावा लागेल. आज सार्वत्रिक सप पुकारायची फेडरेशनची तयारी नाहीं. म्हणून आमच्या भट्टी कामगागना आपल्या मागण्या थोड्या खाली उतरायला सागून माने तडजोड घडवून आणायला पाहतोय्, दुसर काय?

**धुमाळ :** सार्वत्रिक संपाची फेडरेशनची तयारी नाहीं तर?—यापूर्वीच आम्हाला हें कुणीं सागितल का नाही?

**देशमुख :** सर्व काहीं स्पष्टपणें सागितल होत.

**कुळकर्णी :** आपण त्या सभेला गैरहजर होता, बापूसाहेब.

**वाठारकर :** फेडरेशनचा पाठिबा नाहीं, खायला अन्न नाहीं—तरी कामगाराच्या डोळयातल संपाच हे वेड जात कस नाहीं अजून?

**देशमुख :** जाधव!—जाधव पुढारी आहे तोपर्यंत—

**धुमाळ :** जाधवासारखा माथेफिरू आमच्या कामगाराना पुढारी मिळावा हें तुमच आमच दैव, दुसर काय?

**हिरालाल :** (बाबासाहेबावर नजर रोखून) तस पाहिल तर कामगाराचंहि दैव काहीं कमी खोट नाहीं!

**धुमाळ :** त्याच दैव म्हणा की आमच दैव म्हणा, सगळा चुथडा झालाय् यात सशय नाही—चाललय् हें आपल्याला मुळीच पसत नाही. केव्हापासून मी हेच म्हणतोय्—होय की नाहीं, हिरालालशेठ? दोन महिन्यापूर्वी मी आणि हिरालाल इथं आलो होतो, तेव्हा कामगार मेटाकुटीला आलेले दिसले. दोनचार दिवसात सप कोलमडणार अशी आमची खात्री झाली होती. मॅनेजरसाहेब, तुमचहि तसच मत होत!

**देशमुख :** खर आहे.

**धुमाळ :** पण त्यानतर आज दोन महिने झाले तरी सप कोलमडण्याच काहींच चिन्ह नाही. धदा बसत चाललाय्. गिऱ्हाइक दुसऱ्या कारखान्याकडे वळताहेत—आपल्या शेअर्सचा भाव घसरत चाललाय्—

**वाठारकर :** (डोकं हलवीत) छे, छे, छे, छे—

**हिरालाल :** आतापर्यंतच्या आपल्या नुकसानीचा अंदाज काय आहे, कुळकर्णी?

**कुळकर्णी** : अडीच ते पावणेतीन लाख रुपये !

**वाठारकर** : (दुःखाने) अं ?—काय म्हणता काय ?—म्हणजे एवढ्या पैशाची माती झाली—अगदीं माती झाली. एक पै त्यातली परत येणार नाही !

**धुमाळ** : कामगार इतका टिकाव धरतील असं कुणालाच वाटल नव्हत—कुणा एकाला तरी काहीं कल्पना !—

**वाठारकर** : (डोक हलवीत) आपणाला हे लढे आणि लठ्ठालठ्ठी कधीच पसत नव्हती, नि कधी पसंत पडणारहि नाहीं !

**बाबासाहेब** : लढा म्हणजे लढा—माघार नाहीं म्हणजे माघार नाही—

[सर्व जण त्याच्याकडे पाहतात]

**धुमाळ** : कोण म्हणतोय् माघार घ्यावी म्हणून ? (बाबासाहेब धुमाळाकडे पाहतात.) नाही—म्हणजे माझ म्हणण इतकच कीं, आपण मागलापुढला सर्व विचार करावा—दोन महिन्यापूर्वी जाधवाला सर्वाधिकार देऊन कामगारानीं बोर्डाशी बोलणी करायला पाठवल होत, त्याच वेळेला तडजोड करून टाकायला हवी होती. त्याला मोठेपणा देऊन थोडा हरभऱ्याच्या झाडावर चढवायला हवा होता, पण आमच्या अध्यक्षमहाराजानी (बाबासाहेब धुमाळाकडे पाहतात. धुमाळ नजरेला नजर भिडवीत नाहींत.)—अध्यक्ष-महाराजानीं म्हणजे काय—आपण सर्वांनीच कोण्या झाडाचा पाला म्हणून त्याला बाहेरच्या बाहेर उडवून लावला थोडी पड आपण खाली असती तर—थोडी तडजोडीची वृत्ति आपण—

**बाबासाहेब** : तडजोड अशक्य !

**धुमाळ** : हेच ते ! सहा महिने हें अस्स चाललय्—आणखी किती महिने हे अस चालणार आहे कुणाला ठाऊक ! तोपर्यंत धद्याचा आणि आपला मात्र निकाल लागणार ! त्यातल्या त्यात समाधान म्हणजे कामगाराइतके आपण काही जेरीला आलेले नाही !

**दिवाकर** : खरच, चद्रशेखर, कामगाराचे भयकर हाल चाललेत ?

**देशमुख** : (निर्विकारपणें) भयकर!

**धुमाळ** : पण ते इतका टिकाव धरतील अशी कुणाचीच कल्पना नव्हती.

**देशमुख** : कामगाराना जे ओळखतात त्याची होती !

**धुमाळ :** या बोलण्यात काहीं अर्थ नाहीं!—असो. आपण मात्र भलत्याच नुकसानीत येणार. उसाचा भाव चढत चाललाय् कारखाना पुन्हा चालू करताना नुसता रिपेरीचा खर्चच—मशिनरी गजू लागलीय्—

**हिरालाल :** अध्यक्षाच काय मत आहे?

**बाबासाहेब :** सगळ खर आहे, पण त्याला काही इलाज नाहीं.

**धुमाळ :** कित्येक वर्षे शेअर-होल्डराना नफा वाटता येणार नाहीं.

**वाठारकर :** (मुद्दा सापडल्यामुळे जोरात) बरोबर आहे! शेअर-होल्डराचा तरी आपण विचार करायलाच पाहिजे. (बाबासाहेबाकडे बघून) शेअर-होल्डराच्या हिताची काळजी आपण घेतली पाहिजे, हे अध्यक्षहि मान्य करतील—

[ बाबासाहेब तोंडातल्या तोंडात पुटपुटतात ]

**वाठारकर :** काय म्हणताहेत अध्यक्ष?

**कुळकर्णी :** अध्यक्ष म्हणताहेत, शेअर-होल्डरापेक्षा आपलीच काळजी त्याना अधिक वाटते!

**वाठारकर :** (वरमून) माझी? ठीक!

**धुमाळ :** ही थट्टेची वेळ नव्हे! चेअरमनसाहेबाना वर्षानुवर्षे नफा न मिळालेला चालत असेल—आपली मात्र यापुढें तशी मुळीच तयारी नाही शेअर-होल्डराच्या भाडवलाची वाटेल तशी उधळपट्टी करायचा आपणाला मुळींच अधिकार नाही. शेअर होल्डराच्या सुखदुःखाचा आपण काही तरी विचार करायला नको का?

**दिवाकर :** करायलाच पाहिजे!

[बाबासाहेबाखेरीज इतर सर्व अस्वस्थ होतात ]

**वाठारकर :** तुमच्या-आमच्या खाजगी भावनाचा हा प्रश्न नाहीं, दिवाकर—

**दिवाकर :** (स्वतःची लाज वाटल्याच्या स्वरात) मला वाटत, कामगाराच्या सुखदुःखाचाहि आपण थोडाबहुत विचार करायला पाहिजे!

[ बाबासाहेबाखेरीज इतर सर्व अस्वस्थ झालेले दिसतात ]

**वाठारकर :** तुमच्या-आमच्या खाजगी भावनाचा हा प्रश्न नाहीं, दिवाकर—

आपण असं भावनावश होऊन चालणार नाही.

**दिवाकर** : तुमच्या-आमच्यात भावनाचा कधीं प्रश्नच उद्‌भवत नाहीं ! मी कामगाराच्या भावनासंबधी बोलतोय्—

**धुमाळ** : ते सर्व ठीक आहे. पण आपणाला धदा करायचाय्—भावनाचीं काव्य करायची नाहींत !

**दिवाकर** : नाहीं, नाहीं म्हटल तरी धद्यातसुद्धा भावनाची दखल घ्यावी लागतेच. धद्याचा परिणाम शेवटी कुणाला तरी सुख आणि कुणाला तरी दुःख देण्यात होतो-ा. धदा करायचा म्हणजे काळीज असताच कामा नये, किवा असलच तर ते उलट असल पाहिजे, असं तर काहीं शास्त्र नाहीं ना ?

[ कुणी बोलत नाही ]

**हिरालाल** : मला वाटत आजच्या सभेत आपणाला आपल्या धद्याच भवितव्य ठरवायचय्—आपापली काळज कुठ नि कशीं ठेवायची हा प्रश्न आजच्या सभेपुढें नसावा—काळजाच्या भाडवलावर कुणी धदा चालवलेला मला तरी माहीत नाहीं !

**दिवाकर** : तुम्ही काही म्हणा, पण चाललय् हे मला मुळीच पसत नाहीं.

**बाबासाहेब** : भाडण आपण नाही उकरून काढलं—

**दिवाकर** : ते मला माहीत आहे, बाबा, पण आपण प्रत्येक गोष्ट तुटेपर्यंत ताणतो आहोत, अस मला वाटत.

**बाबासाहेब** : मला अस मुळीच वाटत नाही.

[ सर्वजण एकमेकाच्या तोंडाकडे पाहतात ]

**हिरालाल** : कुणाला काय वाटत ते सध्या बाजूला राहू द्या. पण आपण काय करतो आहोत त्याचे परिणाम निदान आपल्यावर तरी काय होतील याचा विचार आपण करायलाच पाहिजे.

**बाबासाहेब** : कामगारापुढ तुम्ही एकदा नमलात कीं जन्मभर तुम्हाला नमतच राहिल पाहिजे.

**हिरालाल** : तुम्ही म्हणता त्यात खूपच अर्थ आहे, बाबासाहेब—( 'होय' अशा अर्थानें बाबासाहेब मान हलवतात.) पण आपल्या तत्त्वाला किंचितहि

मुरड घालणं म्हणजे आपण अगदीं ब्रह्महत्येचं पातक समजता कीं काय? ('होय' या अर्थानें बाबासाहेब ठासून मान हलवतात.) अशा प्रकारे तत्त्वासाठी हुतात्मे होण्यासारखी सध्या तरी आपली परिस्थिति नाहीं, चेअरमन्साहेब! आपल्या शेअर्सचा भाव सध्या सारखा घसरत चाललाय्.

**धुमाळ :** असेच आणखी काही महिने गेले तर आपल्या शेअर्सना काही भावच उरेल कीं नाहीं याची मला शंका आहे!

**वाठारकर :** (घाबरटपणें) छे, छे! इतकं भयंकर काही होईलसं मला नाहीं वाटत—

**धुमाळ :** पाहाल किती भयंकर होईल ते—(बाबासाहेब काहीं पुटपुटतात ते ऐकण्याकरिता डोके पुढे करतात.) चेअरमनसाहेब काय म्हणाले तें नीटसं ऐकू नाहीं आलं—

**कुळकर्णी :** (चाचरत) तत्त्व—तत्त्वभ्र...

**दिवाकर :** (स्पष्ट स्वरात) चेअरमन्साहेब म्हणताहेत कीं तत्त्वभ्रष्टतेइतकं जगात काहीच भयंकर नाहीं.

**धुमाळ :** अं!

**वाठारकर :** (असहायपणे) चेअरमन्साहेबांचा हा वेदांत आपल्याला बुवा कधींच पटलेला नाही—पटलेला नाहीं म्हणजे काय समजलेलाच नाहीं!

**धुमाळ :** पटो अगर न पटो, त्यात धंद्याची माया मात्र विरघळून जाईल!

**हिरालाल :** (मनधरणीच्या गोड स्वरात) खरंच, बाबासाहेब, या तत्त्व-निष्ठेच्या मागं भरकटत जाऊन हे धंद्याचं तारूं तुम्ही उघड्या डोळ्यानीं बुडूं देणार?

**बाबासाहेब :** तारूं बुडणार नाहीं.

**वाठारकर :** (भेदरटपणें) माझ्यापुढें तरी या बुडण्याबिडण्याच्या गोष्टी बोलू नका बुवा!

**बाबासाहेब :** (त्यांच्या डोळ्यात मिश्किलपणाची छटा दिसते.) सर्वच उंदीर बुडणारं तारूं सोडून पळत नाहीत, हणमतराव!

**वाठारकर :** अजूनहि तुम्हाला थट्टा सुचते, बाबासाहेब!

**बाबासाहेब :** थट्टा नाहीं, हणमतराव—कामगारांच्या वाटेल त्या मागण्या

मीं आतापर्यंत कधीहि मान्य केलेल्या नाहीत--आणि त्याच्यापुढें कधी हारहि खाल्लेली नाही !—

**हिरालाल :** तुम्ही सांगता ते तत्त्व आम्हाला कधीच अमान्य नव्हत, चेअरमन्साहेब. तुमच अगदी बरोबर आहे, पण सर्वच जग तुमच्या-सारख्या पोलादी पुरुषाच नाही--निदान शेअर-होल्डराच तरी--

**बाबासाहेब :** आपण इतकी कळ सोसलीच पाहिजे.

**धुमाळ :** (उठून खिडकीकडे जात) खूप सोसली. आता प्राण जाण्याची वेळ आली आहे.

**बाबासाहेब :** जोडयाना डोक्यावर चढू देण्यापेक्षा प्राण गेला तर काय वाईट !

**धुमाळ :** आपण आपल्या प्राणावर उदार झाला असाल, बाबासाहेब--पण आम्ही सर्व इतके उदार झालो आहोत अस मला नाही वाटत--निदान मी तरी नाही झालेला !

[बाबासाहेब धुमाळाकडे काही काळ रोखून पाहतात कुणी काही बोलत नाही ]

**दिवाकर :** (स्तब्धतेचा भग करून) हे असच चालू राहू देण म्हणजे कामगाराच्या बायकामुलाना पद्धतशीरपणे ठार करण्यासारख आहे. हे पाप आपणा सर्वाच्या डोक्यावर बसणार आहे—

[बाबासाहेबाखेरीज सर्वजण अस्वस्थपणे चुळबूळ करतात.]

**हिरालाल :** मघाच्या तुमच्या काळीजप्रकरणासारखच तुम्ही पुन्हा—

**दिवाकर :** धदा करणारांना काळीज किंवा दयामाया याचा लवलेश असता कामा नये अस तुमच मत दिसत, हिरालालशेठ ?

**धुमाळ :** मला खूप दयामाया वाटते, दिवाकरसाहेब, पण--पण (उसना सात्त्विक सताप आणून) कामगारानीसुद्धा किती ताणून धरायच याला काहीं मर्यादा आहे. त्याच्या खूप अडचणी असतील, पण आमच्याहि काही कमी नाहींत--शेअर-होल्डरापुढें आम्हालाहि नाकदुऱ्या काढाव्या लागतात.

**दिवाकर :** (चिडून) एखाद्या वर्षी नाहीं नफ्याचा वाटा मिळाला तर शेअर-होल्डराचे मुडदे पडतील अस नाहीं मला वाटत—त्याच्या भीतीन आपण इतक ताणून धरायच मुळींच कारण नाहीं.

**वाठारकर** : (अस्वस्थपणें) नफा म्हणजे अगदीं काहींच नाहीं का, दिवाकर? अलीकडच्या पिढीच मला हे काहीं कळतच नाहीं.

**धुमाळ** : ते राहू द्या हो. एकच गोष्ट महत्त्वाची आहे. ती म्हणजे या सपा-मुळ आपल्या धद्याच वाटोळ होत चाललय्, ते कसं थाबवायच.

**बाबासाहेब** : काही झाल तरी नमण नाहीं !

**वाठारकर** : आता काय बोलायच याच्यापुढ ?

[ बाबासाहेबाकडे सर्व पाहतात काही क्षण कुणी काही बोलत नाहीं ]

**धुमाळ** : ( खिडकीकडून जागेवर येऊन बसत ) चेअरमन्साहेबाना एवढच सागायच होत तर एवढ्या लाबून—पुण्या-मुबईहून—सुभेदारवाडीपर्यंत यायची यातायात आम्हा सर्वांना कशाकरिता करायला लावली तेच मला समजत नाहीं.

**बाबासाहेब** : एवढ्याचकरिता की तुमच्यापुढे आम्ही कधीच नमणार नाहीं हे कामगाराना स्पष्टपणें बजावून सागण्याकरिता ! (कठोर चेहरा करून) आपण सर्वांनी त्याच्या तोडावर त्याना निक्षून तस सागितल्याशिवाय त्याची खात्री पटायची नाही म्हणून.

**धुमाळ** : हू ! त्या माथेफिरू जाधवान हेच शब्द आमच्या तोडावर फेकण्या-करिता आम्हाला इथ बोलावण्याची व्यवस्था केलेली असावी अस मला सारख राहून राहून वाटतय्—असल्या तक्रारखोर माणसाची मला मनापासून चीड येते.

**दिवाकर** : त्याला तक्रार करायला खूपच जागा आहे. त्यान यत्रात सुचविलेल्या सुधारणेमुळें आपला किती तरी फायदा झाला, पण आपण त्याबद्दल त्याला काय दिल ?

**धुमाळ** : का ? पुष्कळ दिल की. हजार रुपये रोख नि त्या वर्षाचा बोनस दुप्पट दिला कीं !—

**कुळकर्णी** : (तक्रारीच्या सुरात) पण त्याची तक्रार अशी आहे धुमाळ-साहेब, कीं आपल्या सुधारणेमुळें कपनीला आतापर्यंत एक लाख तरी फायदा झाला असेल—पुढें आणखी होईल तो वेगळाच—नि आपणाला मात्र हजार रुपये मिळाले.

**धुमाळ** : त्याची तक्रार त्याचा किंवा आमचा निकाल लागेपर्यंत चालणार! एक आग विझली की दुसरी लावायची हा त्याचा धदाच आहे. हें पाहा, आपण आता मुख्य विषयाकडे वळू या. त्या फेडरेशनवाल्याना जोड्याशी-सुद्धा उभ करू नये, असं मला मनापासून वाटत. पण त्या वाटण्यापासून आता काहीं फायदा नाही. फेडरेशनचा तो माने इथं येतोच आहे आपल्याला भेटायला, तेव्हा सोपवून टाकू त्याच्यावर सप मिटविण्याच काम.

**बाबासाहेब** : अशक्य आहे.

[ सर्व त्याच्याकडे पाहतात ]

**देशमुख** : जाधवहि मानेवर सर्व काहीं सोपवायला तयार होणार नाही.

**वाटारकर** : माथेफिरू लेकाचा !

**धुमाळ** : ( बाबासाहेबाकडे पहात ) अहो, सुभेदारवाडीत पुष्कळच माथेफिरू आहेत, वाटारकरसाहेब !

[ बाबाजी प्रवेश करतो ]

**बाबाजी** : (बाबासाहेबाना) मानेसाहेब आलेत, मानेसाहेब.—कामगाराची कमिटी पण आलीय्—

[ बाबासाहेब मान हलवतात, देशमुख बाहेर जातात काही वेळानें त्यांच्या-बरोबर माने आत येतो ]

**देशमुख** : (बाबासाहेबाच्या शेजारची खुर्ची मोकळी आहे, ती दाखवीत) बसा कीं, माने.

[ गुराच्या कळपात कुत्रा शिरला की सगळी गुर एकमेकाना चिकटून त्याच्या-कडे पाहतात त्याप्रमाणें माने आंत आल्याबरोबर डायरेक्टर बोर्डाने पवित्रा घेतला आहे ]

**माने** : (सर्वाच्याकडे तीक्ष्ण नजरेनें एक दृष्टिक्षेप टाकीत खुर्चीवर बसता बसता) नमस्ते ! (क्षणभर थाबून) काहीं तरी सोक्षमोक्ष लावायचा आपणा सर्वाचा आज तरी विचार आहे असं मी धरून चालतो !

**धुमाळ** : तुमच्या मनात कुणाचा सोक्ष नि कुणाचा मोक्ष लावायचा आहे त्याच्यावर सर्व काहीं अवलबून आहे, माने ! आधीं कामावर जा म्हणून तुम्हीं कामगाराना सागायला पाहिजे.

**माने** : (औपरोधिक स्वरात) म्हणजे नाक मुठींत धरून कामगारानी आधीं कामावर जायच, होय ? भट्टीखात्याच्या थोड्याशा भानगडीमुळ फेडरेशननें आपला अधिकृत पाठिंबा काढून घेतलेला असला, तरी तुमच्यापेक्षा कामगाराच्याच बाजूला अधिक न्याय आहे, याबद्दल आमची खात्री आहे. उलट सुभेदारवाडीच्या कामगाराना पुन्हा पूर्ण पाठिंबा द्यावा कीं काय असा आमचा विचार चाललाय्.

[बोलता बोलता इतरापेक्षां बाबासोहेब सुभेदाराना उद्देशनच माने अधिक बोलतो आहे ]

**बाबासाहेब** : जरूर पाठिंबा द्या. उत्तर प्रदेशातून चारशे कामगार आणून कारखाना चालू करायचा मी निश्चय केलाय्.

**माने** : ते शक्यच नाही. तिथल्या साखर कामगार युनियनला आम्हीं लिहिलय्.

**बाबा** : लिहल की सर्व झाल अस नाहीं !

**माने** : सुभेदारसाहेब, तुमच्याशी भाडण वाढवायला मी आलेला नाही. तुमच्याशीं मी आज अगदी प्राजलपणें बोलणार आहे. तुमच्या कामगाराच्या काही मागण्या फेडरेशनलाहि भरमसाट वाटल्या म्हणून आम्हीं त्याचा पाठिंबा काढून घेतला. आज कामगाराशी माझी मुलाखत आहेच. बहुतेक भरमसाट मागण्या त्याना मी माग घ्यायला लावीन, असा मला विश्वास वाटतो. तेवढ त्यानी कबूल केल की फेडरेशन सर्वतोपरी कामगाराच्या माग उभ राहील. मग तुमची आमच्याशी—म्हणजे महाराष्ट्रातल्या सर्व साखर-कामगाराशी गाठ आहे, हे ध्यानात ठेवा. आज सध्याकाळपर्यंत आपण सर्व गोष्टीचा निकाल लावून टाकू—उगाच दोन्ही बाजूनीं तुटेपर्यंत —दमछाट होईपर्यंत ताणीत राहायच यात काहीं अर्थ आहे का ? हे अस ताणल्यामुळे तुमचा काही तरी फायदा होईल का ? कामगारहि तुमच्यासारखीच माणस आहेत—त्यानाहि चार पैसे मिळवावे नि सुखात राहाव अस वाटत, हे तुम्ही विसरता कामा नये. (कटु स्वरात) तुम्हाला बगले आहेत, मोटारगाड्या आहेत—

**बाबासाहेब** : कामगार विनशर्त कामावर परत येत असतील तर आम्ही त्याच्यासाठी काहीं तरी करूं.

**माने** : (औपरोधिक नजरेने प्रत्येकाच्या चेहऱ्याकडे पाहात वाठारकराना) तुमचहि असच मत आहे का ? (धुमाळाना) तुमच ? (हिरालालना) तुमच ? (कुणी काहींच बोलत नाही.) ह ! कामगाराना हक्क बिक्क काहीं नाहीत—मालक पगार देतात म्हणजे कामगारावर उपकार करतात, ही त्रेतायुगातली विचारसरणी विसाव्या शतकात अजूनहि कुठ शिल्लक असेल अशी माझी कल्पना नव्हती. पण सुभेदारवाडी अजून त्याच युगात घोरत पडलेली दिसते !

**बाबासाहेब** : काम करतो म्हणजे मालकावर उपकार करतो, ही कामगाराची विचारसरणी आहे—त्याचे विचार त्याच्याजवळ, आमचे आमच्याजवळ. कोण कुणाला पुरून उरतो हाच प्रश्न आहे. पाहू या त्याच्याशिवाय आमच चालत, की आमच्याशिवाय त्याच चालत—

**माने** : तुम्ही सर्व व्यवहारी माणस आहा. या संपामुळे सर्व बाजूनी सर्वांचच किती नुकसान होतय्, याच तुम्हाला काहींच वाटत नाहीं ? बर, या सर्वांचा शेवट काय याचीहि तुम्हाला कल्पना असणारच.

**बाबासाहेब** : काय ?

**माने** : तडजोड,—शेवटी काहींना काहीं तडजोडच व्हायची.

**वाठारकर** : कामगाराच काय किंवा आमच काय, सर्वांच हित एकच आहे हें तुम्हीं कामगाराना पटवून द्यायला पाहिजे, माने

**माने** : (औपरोधिक स्वरात) दिल असत वाठारकरसाहेब, पण ते एक नाहीं एवढीच अडचण आहे !

**धुमाळ** : हे पाहा, माने, तुम्ही काही अगदींच लालभाई नाहीं,—तुमच्या-सारख्या समजूतदार माणसान कामगाराना पटवून द्यायला पाहिजे की कामगाराचे आणि मालकाचे हितसंबंध शेवटी एकच आहेत.

**माने** : एक सरळ प्रश्न आपणाला विचारतो, त्याच अगदी सरळ उत्तर आपण द्या, धुमाळसाहेब. तुमच्या कारखान्याच्या इतिहासात एकदा तरी अस झालय् का, कीं कामगारानी न मागता तुम्ही स्वतः होऊन कामगाराच्या पगारात एकाद्या पैची वाढ केलीय् ? (धुमाळ काही बोलत नाहीत.)

**हिरालाल** : देण भागच आहे त्यापेक्षा एक पैहि अधिक कोणत्याहि वस्तूला

न देण हें तर धदेशास्त्राचं आद्य तत्त्व आहे, अशी माझी कल्पना आहे.

**माने** : हें आद्य तत्त्वच सिद्ध करत कीं कामगाराचे आणि मालकाचे हितसंबंध एक नाहींत.

**वाठारकर** : ही शुष्क चर्चा पुरे झाली, बुवा.

**माने** : ठीक आहे. या सर्व बोलण्याचा अर्थ डायरेक्टर बोर्ड कोणत्याहि तडजोडीला तयार नाहीं असाच समजायचा, होय ना?

[हिरालाल आणि धुमाळ कांहीतरी बोलण्याकरिता पुढें होतात तोंच—]

**बाबासाहेब** : (एकदम) होय!

[वाठारकर काहीं बोलण्याकरितां तोंड उघडतात, पण बोलत नाहींत]

**माने** : आपणाला काहींतरी बोलायचय असं दिसत, वाठारकरसाहेब!

[वाठारकर काहीं बोलत नाहीत.]

**दिवाकर** : (एकदम भावनावेगानें) कामगाराचे हाल पाहून आम्हाला मनापासून वाईट वाटत, माने. खरच, माने—

**माने** : तुमच्या वाईट वाटण्याचं पर्यवसान कामगाराच्या न्याय्य मागण्या मान्य करण्यात जोंपर्यंत होत नाही तोपर्यंत त्याचा काहीं उपयोग नाही, दिवाकरसाहेब! कामगाराना सहानुभूति नको आहे—कामगाराना न्याय पाहिजे.

**बाबासाहेब** : आम्हालाहि त्याच्याकडून न्यायच्च पाहिजे!

**माने** : तुमचा न्याय म्हणजे तुम्ही पाय पुढें करायचा नि कामगारानी त्याच्यावर नाक घासायचीं, हाच ना? कामगारहि तुमच्यासारखींच माणस आहेत, सुभेदारसाहेब. तेवढी पैशाची बाब सोडली तर मालकात कामगारापेक्षा काय अधिक आहे?

**बाबासाहेब** : सर्व काही अधिक आहे.

**माने** : हू!

**वाठारकर** : बाहेर कामगाराची समिति आलीय ना? येऊ द्या त्याना आत. एकदा काय तो निकाल लागू द्या.

[देशमुख बाबासाहेबांकडे पाहतात. बाबासाहेब होकारार्थी मान हलवतात. देशमुख बाहेर जातात.]

**माने :** दुपारीं कामगाराशी माझी मुलाखत आहे तोपर्यंत तरी डायरेक्टर बोर्ड काहीं निर्णय घेणार नाहीं, अशी आशा आहे.

[ देशमुख आत येतात त्यांच्या मागोमाग जाधव, जावजी, पवार, सावळे, साटम वगैरे सपसमितींतले कामगार प्रवेश करतात, ]

**देशमुख** . जाधव, त्या खुर्च्या ओढून बसा कीं सर्व.

**जाधव :** नको, असच ठीक आहे, देशमुखसाहेब ! बोर्डासमोर उभ राहून बोललेलच बर. (मानेकडे पाहात) ओहो ! फेडरेशन इथच आहे कीं !

**माने :** कामगाराच जिथ जिथ हित आहे तिथ तिथ फेडरेशन असतच !

**जाधव :** मालकाच्या घरात कामगाराच हित असत याची मला कल्पना नव्हती !

**माने :** तुम्ही लोक काय कामगाराच अनहित करायला इथ आला आहात कीं काय ?

**बाबासाहेब :** कामगाराच काय म्हणणं आहे ते सागून टाका.

**जाधव :** शेटसाहेब काय बोलले ते नीटस ऐकू आल नाही मला.

**कुळकर्णी :** (बाबासाहेबाच्या खुर्चीमागे ते उभे आहेत.) कामगाराच काय म्हणण आहे ते चेअरमन्साहेबाना ऐकायचय्.

**जाधव :** डायरेक्टर बोर्डाच काय म्हणण आहे ते ऐकायला आम्ही आलोत.

**बाबासाहेब :** बोर्डाला काहींच म्हणायच नाहीं.

**जाधव :** (आपल्या सहकाऱ्याचे चेहरे न्याहाळीत) तर मग बोर्डाचा उगाच वेळ घेण्यात काहीं अर्थ नाहीं ! (टेबलफॅनकडे पाहात सहकाऱ्याना) चला जावजी, साटम, या सुदर पख्याची हवा खाल्ली तितकी पुरे झाली ! (तो जायला वळतो. इतरहि मत्रमुग्ध झाल्यासारखे त्याच्या मागून जायला वळतात.)

**हिरालाल :** (गोड आवाजात) जाधवराव, जरा विचार करा, एकमेकाचीं तोंड बघून परत जाण्याकरिता इतक्या लाबून आम्ही इथ आलो नाहीं—

**जावजी :** बरोबर आहे, साहेब. आमच म्हणण—

**जाधव :** बोला-बोला-जावजीमास्तर, मालक पाहिले कीं तुमच्या तोंडाला

अगदीं लाळ सुटायला लागते ! मालकाशीं बोलायला माझ्यापेक्षा तुम्हीच लायक आहात.

[ जावजीमास्तर गप्प रहातात ]

**कुळकर्णी** : हे पाहा, जाधव, बोर्डानं इथं येऊन प्रत्यक्ष परिस्थिति पाहावी असं कामगारातर्फे सांगण्यात आलं म्हणूनच सर्व डायरेक्टर इथं आलेत ना ? मग कामगाराचं काय म्हणणं असेल तें कळू द्या तरी बोर्डाला.

**जाधव** : सांगायलाच लागलो कामगाराचं म्हणणं तर बोर्डाला आजचाच दिवस काय उद्याचा दिवसहि इथं बसून राहावं लागेल.

**माने** : गृहस्था, एक शब्द तरी सरळ बोल.

**जाधव** : सरळ बोलू काय, माने ? या बंगल्याच्या बाहेर जाऊन सुभेदार-वाडीत एक फेरी मारून या, म्हणजे कामगाराची बायका-पोरं कशीं भुकेनं वाकून गेली आहेत ते दिसेल तुम्हाला, नि मग सरळ बोलणं कितीसं शक्य आहे ते कळेल तुम्हाला.

**माने** : जाधव, तुझ्याइतकाच—तुझ्यापेक्षा थोडा जास्तच कामगाराचा अनुभव आहे मला. मीहि संप लढवलेत. दुपारी भेटणारच आहे मी कामगाराना—

**जाधव** : त्या सर्व अनुभवाचं गाठोडं बरोबर घेऊन या दुपारीं !

**माने** : हे बघ जाधव, तुझी माझी लढत बघायला लोक इथं जमलेले नाहींत. कामगाराचं काय म्हणणं आहे ते सांगून टाक एकदा.

**जावजी** : आमाला—आमाला पाहिजे म्हजे फकस्त न्याव—

**जाधव** : तुम्हाला न्याय पाहिजे ? मालकाकडून कधी न्याय मिळेल अशी अपेक्षा वाटते तुम्हाला, जावजीमास्तर ? तुमचं टाळकं फिरलय् कीं काय ? (जावजी गप्प राहतो ) मालक तुम्हा-आम्हाला माणसं समजत नाहींत. न्याय माणसा-माणसात होत असतो. मालक आपणाला कुत्रीं समजतात. खुशी असली तर कुत्र्यापुढं तुकडा टाकायचा, नाहीं तर पेकाटात लाथ मारून हाकलून द्यायचं ! मुंबईला सुभेदारसाहेबाच्या मुलाखतीला मी गेलो होतो तेव्हा त्यानीं मला स्पष्ट सांगितलं—कामगाराना काय हवं तें मला माहीत आहे, तुझ्यासारख्या अडाणी माणसाला काय समजतंय् ?

**बाबासाहेब** : बरोबर आहे ! सर्वच मालक होऊ शकत नाहींत—कारखाना

चालवायचा म्हणजे काय हव, काय नको तें ठरविणारे कुणी तरी मालक पाहिजेतच.

**जाधव** : तर मग आम्ही मालक होऊ नि आम्हीच काय ते ठरवू.

[क्षणभर स्तब्धता बाबासाहेब आणि जाधव एकमेकांकडे रोखून पाहतात]

**देशमुख** : जाधवराव, कामगाराच्या वतीनें तुम्हाला काही सागायच नसेल तर निदान जावजी, नाहीं तर सावळेला तरी बोलू द्या.

[जावजी आणि सावळे जाधवाच्या तोंडाकडे पाहतात नतर एकमेकाकडे पाहून इतराकडे दृष्टि फिरवतात]

**सावळे** : सागायच म्हणजे इतकच—

**जावजी** : आमी सागनार म्हजे काय? समद्या कामगाराचच—

**जाधव** : हें पाहा, जावजीमास्तर, तुम्ही आपल्यापुरतं बोला, समदे कामगार राहू द्यात.

**वाठारकर** : (सात्विकपणे) या लोकाना तोड उघडायला तरी देशील कीं नाहीं, जाधव?

**जाधव** : उघडू द्या कीं. उघडीच टाकून बसू द्या तोंड—तोडातला घास काढून तुम्हीं घेतलाच आहे सगळयाच्या, शे–ट–सा–हे–ब. बोला कीं, सावळे—जावजीमास्तर! का मीच बोलू?

**पवार** : बोल की एकदाचा. नाहीतर दुसऱ्याना तरी बोलू दे.

**जाधव** : (औपरोधिकपणे) शेटलोकासमोर तुला एकदम वाचा फुटलेली दिसते, पवार! (बाबासाहेबाकडे वळून) स्वतः सुभेदारसाहेब आणि डायरेक्टर बोर्डाचे सर्व डायरेक्टर मुबईहून मुद्दाम कामगाराचं म्हणण ऐकण्याकरिता इतक्या लाब आले हेच गरीब कामगारावर मोठे उपकार झाले. त्याना झाले हेच श्रम खूप झाले. आमचं म्हणण ऐकण्याचे किंवा आपले ऐकवण्याचे आणखी श्रम त्यानीं घेऊ नयेत, एवढीच विनति आहे.

**धुमाळ** : गृहस्था! देवान जीभ दिलीय् तिन एक तरी सरळ शब्द बोल!

**जाधव** : देवान दिली? धुमाळसाहेब, देव कामगाराना काहीएक देत नाहीं —सर्व काहीं भाडवलवाल्यानाच देतो. तोहि बडा भाडवलवालाच दिसतो!

**माने** : जाधव, सध्या तरी तो आकाशात असल्यामुळें त्याच्याशीं लढा नको.

**जाधव** : तुम्हाला कुणाशींच लढा नको आहे, मानेसाहेब.

**हिरालाल** : ज्याकरिता आपण इथ जमलो आहोत त्यासंबधीं तुला काहीं बोलायचंय् कीं नाहीं ?

**जाधव** : सर्व त्याचसंबधी बोलतोय्, साहेब. तुम्ही काही देणार नाहीं त्या-प्रमाणेंच देवहि काही कामगाराना देणार नाहीं याबद्दल माझी खात्री आहे, नि तेंच मी सागतोय्.

**बाबासाहेब** : तुला काय सागायचय् ते मला साग, जाधव. कामगाराच्या वतीन जसा तू बोलणार, तसाच बोर्डाच्या वतीनं सर्व काहीं मी ऐकणार ! [जाधव एकदम गप्प होतो. सर्व डायरेक्टराच्या चेहऱ्यावरून दृष्टि फिरवतो. धुमाळ, वाटारकर, हिरालाल जागच्या जागीं अस्वस्थपणें चुळबुळतात. दिवाकर खाली मान घालून जमिनीकडे पाहात राहतो मानेच्या तोडावर औपरोधिक स्मित दिसते. ] बोल काय ते. मी ऐकतो.

**जाधव** : ठीक आहे, बोलतो.

[ यापुढल्या बोलण्यात ते दोघे एकमेकाकडे रोखून पाहात बोलत आहेत आपण बोललों नसतो ते चेअरमन्साहेब बोलत आहेत अशा अर्थाचे डायरेक्टराचे चेहरे दिसतात, तर जाधवहि आपण जे बोलणार नाही तेच बोलतो आहे असा भाव जाधवाच्या सहकाऱ्याच्या चेहऱ्यावर दिसतो ]

आपणाला इथ बोलावण्याच कारण एवढच कीं पत्रापत्रीन या गोष्टी होत नाहीत. कामगाराच्या हालाना पारावार नाहीं, पण कामगार आपल्या निश्चयात किती ताठ आहेत हे आपण शेट लोकानीं प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहावं अशी माझी इच्छा होती. कामगाराना मुबईच्या वाऱ्या करण शक्य नाहीं. सेक्रेटरीसाहेबानी मॅनेजरसाहेबाना विचारायचं नि मॅनेजरसाहेबानीं सेक्रेटरी साहेबाना कळवायच कीं आणखी आठ दिवस अशीच उपासमार चालू राहिली कीं कामगार आलेच कामावर नाक घाशीत—( देशमुख आणि कुळकर्णी याच्याकडे पाहतो. )

**देशमुख** : तुला माहीत आहे, जाधव, मी अशीं पत्र कधी लिहिणार नाहीं.

**जाधव** : नसाल लिहीत, पण शेवटी गोळाबेरीज तीच असते.

मुंबईला जाऊन चेअरमन्‌साहेबाना मी भेटलो तेव्हा त्यानी मला काय सागितल ?—तू म्हणतोस त्यात काहींच तथ्य नाही. कामगाराची परिस्थिति तुझ्यापेक्षा आम्हाला चागली कळते !

**बाबासाहेब** : कामगाराच्या वतीन तुला काय सागायचय्‌ ते लवकर सागून टाक. -

**जाधव** : तुम्हीं सर्वांनीं प्रत्यक्ष जाऊन पाहा कामगाराची परिस्थिति मी सागत होतो तशी आहे की नाही ते. जितक वाईट होण्यासारख होत ते सर्व काहीं झालय्‌. यापेक्षा आणखी काहीं वाईट करून तुम्ही त्याना वाकवू शकाल अशी तुमची कल्पना असेल तर ती साफ चूक आहे. (जाधवाचे सहकारी आपसात अस्वस्थपणे कुजबुजतात.) आमच्यापैकी प्रत्येकाचा मुडदा पडेल, पण आमच्यापैकी कुणीहि वाकणार नाही. आमच्या मागण्या आम्हीं तुम्हाला लेखी कळवल्या आहेत, त्यातली एकहि माग घ्यायला आम्ही तयार नाहीं. (कुळकर्ण्याच्या हातातल्या कागदाकडे पाहात) मला वाटत, सेक्रेटरीसाहेबाच्या हातात तोच कागद आहे.

**कुळकर्णी** : हू !

**जाधव** : त्यातला एक काना, एक मात्रा इकडची तिकडे करायला आम्ही तयार नाही. (जाधवाचे सहकारी अस्वस्थपणे एकमेकाकडे पाहतात. त्याच्याकडे पाहत) होय की नाहीं ? (ते 'हू' करतात.) मुबईतल्या भेटीत आपणाला सागितल तेच पुन्हा सागतो. त्या कागदावरली प्रत्येक मागणी न्याय्य आहे, नि न्यायाची यत्किंचित्‌ चाड असलेला माणूस त्यातली एकहि मागणी नाकारू शकणार नाही—

**बाबासाहेब** : आम्हाला न्यायाची भरपूर चाड असल्यामुळे त्यापैकी एकहि मागणी आम्हीं मान्य करण शक्य नाही !

[ या शब्दानी डायरेक्टरात आणि जाधवाच्या सहकाऱ्यात खळबळ उडालेली दिसते धुमाळ उठून अस्वस्थपणें खिडकीकडे जातात. बाबासाहेबाची नजर जाधवाच्या सहकाऱ्यावर रोखलेली आहे, तर जाधवाची बाबासाहेबाच्या सहकाऱ्यावर रोखलेली आहे ]

**जाधव** : शेवटचा निर्णय हा ?

**बाबासाहेब :** पहिला, शेवटचा आणि कायमचा!

[ धुमाळ वैतागानें इकडेतिकडे पाहतात ]

**जाधव :** आम्ही मोडूं—कामगार वाकतील अशी तुमची कल्पना आहे. पण तुमची कंपनीहि आता फार तग धरू शकणार नाही याची तुम्हाला कल्पना असेलच. आज कपनी म्हणजे तुम्हीच आहात, सुभेदारसाहेब, पण हे अस किती दिवस चालेल अस तुम्हाला वाटत? (वाठारकरावर दृष्टि रोखून) मला त्याची थोडीबहुत कल्पना आहे. मात्र फेडरेशन आमच्या माग नाहीं—उपासमारीचा कहर झालाय्—बायकापोर तडफड-ताहेत, म्हणून आणखी काहीं दिवस गेले कीं कामगार नाक मुठींत धरून तुमच्याकडे येतील अस काहीं जर तुम्हाला वाटत असेल—

**बाबासाहेब :** आमच्या मनाचीं माप घेण्याच्या नुसत्या उठाठेवी तूं कशाला करतोस, जाधव?

**जाधव :** खर आहे तुमच म्हणण! मालकाचीं मन अजमावण नाही जमणार आम्हा कामगाराना! (एकदम बाबासाहेबावर नजर रोखून) तुमच्या मनाच माप मात्र पुर आहे माझ्याजवळ, सुभेदारसाहेब. तुमच्याबद्दल माझी खात्री आहे.

**बाबासाहेब :** हुशार आहेस तू, जाधव!

**जाधव :** माझ्या मनाबद्दलहि माझी खात्री आहे, सुभेदारसाहेब. माझे शब्द ध्यानात ठेवा. घरदार, बायकापोर धुळीला मिळाली तरी चालतील, पण मी आहे तोंपर्यंत कामगार माघार घेणार नाहींत. तुमच्या कपनीला मात्र साभाळा, सुभेदारसाहेब. तुम्हाला वाटत तितके अडाणी आम्ही कामगार नाही. कपनीची परिस्थिति काय झालीय् हें समजण्याइतकी अक्कल आम्हाला आहे.

**बाबासाहेब :** कपनीची काळजी घ्यायला आम्ही पूर्ण समर्थ आहोत, जाधव. तू घरी जाऊन स्वतःच्या परिस्थितीचा शातपणें विचार कर.

**जाधव :** (एक पाऊल पुढ टाकून) सुभेदारसाहेब, आपल्या कारखान्यातला प्रत्येक कामगार म्हणजे आपला शत्रू—कट्टर शत्रू, नि आपण त्याचे कट्टे शत्रू असा तुमचा खाक्या आहे. आज वर्षानुवर्ष मी पाहतों आहे. जसं वय

वाढत जातय् तशी तुमची ही वृत्ति अधिकच ताठर होतेय्. तुम्हांला दयामाया नाहीं, तुमच मन क्षुद्र आहे, असं मला मुळींच म्हणायच नाहीं. तुम्ही मोठ्या मनाचे आहात; पण शत्रूला दाखवायची दयामाया, वैऱ्याच्या बाबतींत दाखवायचा मनाचा मोठेपणा तुम्ही कामगाराना दाखवता. मित्र म्हणून तुम्ही त्याच काहीं एक ऐकायला तयार नाहीं. आतापर्यंत चार वेळा या कारखान्यात संप झाले, चारहि वेळा तुम्हीं ते निर्दयपणें मोडून काढलेत. प्रत्येक खेपेला कामगाराना दातात तृण धरून शरण यायला लावलत. झुज तुम्हाला मनापासून 'आवडते अस मीं ऐकलय्. तुमच्या आयुष्यातली ही शेवटची झुज आहे—नि ती तुम्ही जिकणार नाहीं हें खूप समजून राहा.

[ कुळकर्णी जाधवाच्या कोटाची बाही हळूच ओढतात. ]

**देशमुख** : जाधव! जाधव!

**जाधव** : जाधव! जाधव! जाधवाला सर्वांनीं आवरा! चेअरमनसाहेबानीं आपल म्हणण ठासून सागाव—मीं मात्र माझं म्हणण ठासून सागूं नये!

**धुमाळ** : हें चाललंय् तरी काय?

**बाबासाहेब** : (धुमाळाकडे पाहात स्मित करीत) बोल, बोल जाधव. अगदीं ठासून बोल तू, जाधव!

**जाधव** : (एक क्षण स्तब्ध राहून) बोलायच ते बोलून झालय् माझ.

**बाबासाहेब** : बोर्डाची सभा संध्याकाळीं साडेपाच वाजेपर्यंत तहकूब करण्यात येत आहे.

**हिरालाल** : (देशमुखाना) अशान कशाचा निकालच लागणार नाहीं.

**जाधव** : (औपरोधिक स्वरात) आमच म्हणण शातपणें ऐकून घेतल्याबद्दल चेअरमन्साहेबाचे नि बोर्डाचे आभार मानावे तेवढे थोडेच होणार आहेत!

[ तो बाहेर जायला वळतो. त्याचे सहकारी अगतिकपणें एकमेकांकडे पाहतात. पवार जाधवाकडे क्षणभर रोखून पाहून बाहेर निघून जातो इतरहि त्याच्यामागून जातात ]

**जाधव** : (दरवाजात माग वळून) देव कपनीच भलं करो! (बाहेर जातो)

**माने** : (औपरोधिकपणें) आपण सर्वांनीं दाखवलेल्या तडजोडीच्या वृत्तीबद्दल सर्वांच मी मनःपूर्वक अभिनंदन करतो! कामगारांना भेटून त्याचा काय तो

निर्णय तुम्हांला कळवायला साडेपाच वाजता मी पुन्हा येतोंच. अच्छा, नमस्ते!

[ माने क्षणभर बाबासाहेबांकडे पाहतो बाबासाहेब शातपणें त्यांच्या नजरेला नजर देतात बाकीचे अस्वस्थ झालेले दिसतात माने बाहेर पडतो. त्याच्या मागून देशमुख जातात. ]

**ुमाळ** : (कमालीच्या वैतागानें) वीट आलाय् या सर्व गोष्टींचा!

[ बाजूचा दरवाजा उघडून दया प्रवेश करते. ]

**्या** : जेवण तयार आहे—मला वाटत तुमची सभा सपली. (दिवाकर उठून निघून जातो.)

**ुमाळ** : काय, वाठारकरसाहेब? जेवून घ्याव झाल!

**ाठारकर** : हो—ते तर आहेच!

**ुमाळ** : चला, उठा मडळी. आमची साडेचाराची गाडी आता चुकलीच. (दयेकडे वळून ) बगल्याच्या माग तुम्हीं म्हणे एक सुदर ग्रीनहाउस कीं लता कुज कायसं केलय्—देशमुख म्हणत होते, दयाबाई? दुपारच्या वेळींहि अगदीं थडगार असत म्हणे. जेवायच्या आधीं थोडा वेळ तिकडे पाय मोकळे करून येऊ, वाठारकरसाहेब.

**्या** : जरूर जा तिथ, धुमाळसाहेब. फार बर वाटत.

[ धुमाळ आणि वाठारकर जातात. ]

**हेरालाल** : (बाबासाहेबाच्या जवळ जाऊन) काय वाटेल तें होवो—अगदीं नाहींच वाकायचं असं ठरवलंय तुम्ही, बाबासाहेब?

[ बाबासाहेब होकारार्थी मान हलवतात. ]

**हेरालाल** : त्यातला धोका मात्र लक्षात घ्या, बाबासाहेब—प्रत्येक गोष्टीला काहीं मर्यादा ही असतेच—

[ बाबासाहेब कांही बोलत नाहीत ]

**हेरालाल** : (गंभीरपणें) सुईच्या अग्रावर राहील इतकी मातीहि देणार नाहीं असं म्हणणाऱ्या दुर्योधनासारख वागून नाहीं चालायच, बाबासाहेब. पाहा, विचार करा—(आत जातो. टेबलावरील कागदपत्र गोळा करण्यांत कुळकर्णी गुतले आहेत.)

**दया** : तुम्हीहि आमच्या ग्रीनहाउसमध्यें थोडी मोकळी हवा खाऊन या कीं, कुळकर्णी. का तुमच काम उरलय अजून ?

**कुळकर्णी** : (कागद आवरीत.) छे, छे ! तसं काहींच काम नाहीं. (बाबा-साहेबाकडे पाहात) साहेबाच्या एक दोन सह्या घ्यायच्याहेत त्या मागाहून घेईन. (कागद नीट ठेवून निघून जातो)

**दया** : (जवळ जाऊन एकदम) मिटणार ना हा संप, बाबा ?

**बाबासाहेब** : नाहीं.

**दया** : (निराश स्वरात) काहींच तडजोड शक्य नाहीं का? (बाबासाहेब नकारार्थी मान हलवतात.) हे म्हणत होते कीं कामगाराच्या मनात काही तरी तडजोड व्हावी अस आहे—फक्त जाधव मात्र तडजोडीच्या अगदीं ठाम विरुद्ध आहे.

**बाबासाहेब** : जाधवच का?—मीसुद्धा तडजोडीच्या ठाम विरुद्ध आहे.

**दया** : तुम्हाला कल्पना नाहीं, बाबा—आम्हाला इथ रहाण किती भयकर कठीण झालय त्याचीं. असल्या परिस्थितीत मॅनेजरसाहेबाची बायको म्हणून कुठ तोंड बाहेर काढायची सोय नाहीं.

**बाबासाहेब** : अस्स ?

**दया** : कामगाराची पोर बाळ भुकेन तडफडतायूत—कित्येकाच्या घरात चार चार दिवस चूल पेटत नाहीं. त्याच्या समोर तोंड दाखवण्याची आम्हाला लाज वाटते, बाबा. मी मागे आजारी होते—त्या भयकर आजारात सोबतीला ती गिरिजा होती—आठवते ना तुम्हाला ?–(बाबासाहेब मान हलवतात.) ती या जाधवाची बायको. गेल सबध वर्ष काळजाच्या कसल्याशा विकारान ती आजारी आहे. हा सप सुरू झाल्यापासून औषध-पाण्यालाच काय, पण खायलामुद्धा त्याच्याजवळ पैसा नाहीं. भाताची पेज घ्यायला डॉक्टरानीं सागितलय तिला, तीसुद्धा कित्येक दिवस मिळत नाहीं हो तिला. खरंच बघवत नाहींत, बाबा, एकेका कुटुबाचे हाल—

**बाबासाहेब** : असं ? बिचारी गिरिजा ! औषधपाण्याला तिला लागतील तितके पैसे दे—इथून पेज करून पाठव रोज तिला.

**दया :** मीं म्हटल तिला तसं, पण आमच्याकडला कसला कणहि घ्यायची जाधवान बदी केलीय तिला.

**बाबासाहेब :** या हटवादीपणाला जबाबदार कोण ? हा हटवादीपणाच कामगारानी सोडून द्यायला पाहिजे.

**दया :** आधीं जगू वाचू द्या बिचाऱ्याना, बाबा—हा सप आधीं मिटवून टाका. माझ्यासाठीं तरी, बाबा, एवढ करा—

**बाबासाहेब :** (तिच्याकडे रोखून पाहात) तुला यात काहीं समजत नाहीं, दया !

**दया :** समजायचं काय आहे त्यात ? मी तुमच्या बोर्डावर असते तर—

**बाबासाहेब :** तर काय ?

**दया :** तर तुमच्यासारख विनाकारण तुटेपर्यंत ताणून—

**बाबासाहेब :** हं !

**दया :** हं काय, बाबा ? काय अगदी आकाश कोसळणार आहे, कामगाराची एखादी-दुसरी मागणी मान्य केली तर ? विनाकारण—

**बाबासाहेब :** विनाकारण—विनाकारण—तुमच्या या तरुण पिढीला समजत नाहीं ते हेंच. या लढ्याच्या माग फार मोठं कारण आहे. तू, मी, आपण—आपल्यासारखे सर्व—ज्याच्याकडे बुद्धि आणि संपत्ति आहे अशा वर्गांन हें जग सुसमृद्ध आणि सुसंस्कृत केलय ते केवळ सख्येच्या आणि दाडगाईच्या जोरावर हा मजूरवर्ग हिसकावून घ्यायला पाहतोय ! त्याची एकएक मागणी म्हणजे या लढाईत एकएक पाऊल सरशी—

**दया :** तुम्ही काय बोलता आहात ते मला कळतच नाहीं, बाबा ! कसली लढाई नि कसली सरशी ?—त्याचीं पोरबाळ अन्नान्न होऊन तडफडताहेत—त्याच्या बायकाच्या अंगावर चिंध्या सुद्धा पुरेशा नाहीत—

**बाबासाहेब :** लढाई ते जिकले तर तुझ्या अंगावर पुरेशा चिंध्या उरणार नाहींत. तुझी पोरबाळं उपाशी तडफडायला लागतील.

**दया :** ते नि आपण—ते नि आपण ! तुमची भाषाच मला समजत नाहीं, बाबा ! आपण सर्व माणसंच नाहीं का ? आपण सर्व एकच नाहीं का ?

**बाबासाहेब** : नाहीं !

**दया** : हीच भाषा तो जाधव बोलतो ! (बाबासाहेब ओठ दाबून धरतात.) कामगार धुळीला मिळाले तरी त्याची त्याला पर्वा नाहीं, नि कंपनीचं दिवाळं वाजलं तरी तुम्हाला त्याचं काहीं नाहीं !—

**बाबासाहेब** : कंपनीचं हित तुझ्यापेक्षा मला जास्त कळतं, दया.

**दया** : असेल बाबा, पण—पण या संपाच्या भानगडींत गिरिजेचं जर काहीं बरवाईट झालं तर जन्मभर तें पातक माझ्या डोक्यावर आहे असं मला वाटेल. तिच्यासाठीं—तिच्यासारख्या इतर बायाबापड्यासाठीं—गोरगरिबाच्या पोराबाळासाठीं तरी हा संप मिटलाच पाहिजे. नाहीं तर—

**बाबासाहेब** : नाहीं तर काय ?

**दया** : आम्हाला इथं राहणं अशक्य होईल. (बाबासाहेब तिच्या चेहऱ्याकडे रोखून पाहतात. ती त्याच्या खांद्यावर हात ठेवते.) तुमच्या प्रकृतीवर या संपाचा किती ताण पडलाय् याचा तरी तुम्ही विचार केलाय का, बाबा ? डॉ. बेदरकरानीं तुम्हाला पुन्हा पुन्हा बजावून सांगितलंय—

**बाबासाहेब** : डॉ. बेदरकराना तरुणाचे रोग समजतात—म्हाताऱ्याचे नाहीं समजत !

**दया** : तुम्हीं दाखवायची तितकी तत्त्वनिष्ठा जन्मभर दाखविलीत, बाबा. आता इतराना काय करायचं ते करू द्या—

**बाबासाहेब** : म्हणजे इतराच्या हातात धंदा सोपवून मी—

**दया** : तसं नव्हे, बाबा. (क्षुब्ध होऊन) आम्हाला इथं दिवस काढायचेत—आमच्यासाठीं तरी तुम्हीं—

**बाबासाहेब** : तुमच्यासाठींच मी सर्व काहीं करतों आहें.

**दया** : या वयात भलतीच झुंज तुम्ही खेळत आहात, बाबा.

**बाबासाहेब** : असेल, पण हातपाय गाळून एक तसूभरहि माघार मी घेणार नाहीं, हें मात्र ध्यानात ठेव.

[कुळकर्णी प्रवेश करतात. कागदपत्रे इकडचे तिकडे तिकडे करीत त्या दोघांकडे पहातात. धीर एकवटून बोलतात.]

**कुळकर्णी** : जेवायला जाण्यापूर्वी साहेबांच्या एवढया सह्या झाल्या तर—(दया क्षणभर त्याच्याकडे पाहते. बाबासाहेबांकडे एक दृष्टिक्षेप टाकते, आणि आत जाते. कुळकर्णी कागद आणि फाउटनपेन बाबासाहेबांपुढें धरीत) एवढया सह्या—(बाबासाहेब पेन घेऊन सह्या करतात. टिप-कागदानें त्या टिपीत ) साहेब, तुमच्या समोर मी कधीं बोलत नाही, पण आज—(अडखळतो)

**बाबासाहेब** : काय ?

**कुळकर्णी** : तुमच्या कृपेन मी या सेक्रेटरीच्या जागेपर्यंत येऊन पोहोचलो, साहेब. तुमच्या आशीर्वादानें आमचं सर्वांच ठीक चालल होत, साहेब. पण काही कारणान कपनी जर बंद झाली तर आमची फार भयंकर स्थिति होईल.

**बाबासाहेब** : तुमच्यापेक्षाहि माझी फार भयकर स्थिति होईल, कुळकर्णी !

**कुळकर्णी** : मला कल्पना आहे त्याची, साहेब. पोटच्या पोरासारखी आपणच या कपनीला लहानाची मोठी—

**बाबासाहेब** : मीं एकट्यानें तर ती स्थापन केली.

**कुळकर्णी** : खरं आहे, साहेब! पण हा संप चालू राहिला नि कपनीच्या शेअर्सचा भाव असाच अधिकाधिक पडू लागला तर बोर्डांचे इतर डायरेक्टर संपाच्या बाबतींत आताच्या इतकेच ताठ राहतील असं मला नाही वाटत.

**बाबासाहेब** : (औपरोधिकपणें) हू !

**कुळकर्णी** : आपण कधीच वाकणार नाहीं हे मला माहीत आहे, साहेब. पण—पण इतर डायरेक्टराना हा ताठपणा आता फार झाला अस वाटतय्—

**बाबासाहेब** : तुम्हालासुद्धा तसंच वाटतय्, कुळकर्णी ? होय ना ?

**कुळकर्णी** : (ओढून ताणून चेहरा हसरा करीत) होय, साहेब. (घाईघाईन) आम्हा गरीब माणसाना पुष्कळ गोष्टींचा विचार करावा लागतो, साहेब. आपल्यासारखा उग्र निश्चय सर्वांनाच कसा साधणार ? (बाबासाहेब त्याच्याकडे रोखून पाहतात.) मी फार बोललो, साहेब. इतक बोलायचा माझा मुळींच विचार नव्हता—पण आपणाला वेळेवर सूचना द्यावी—

**बाबासाहेब** : पण सूचना तर तुम्हीं काहींच दिली नाहीं अजून, कुळकर्णी.

**कुळकर्णी** : स्पष्ट कस बोलाव ते मला समजत नाहीं, साहेब.

**बाबासाहेब** : काय वाटत तें स्पष्टपणें खुशाल बोला, कुळकर्णी.

**कुळकर्णी** : छे—नाहीं—साहेब—

**बाबासाहेब** : (हुकमी स्वरात) बोला.

**कुळकर्णी** : (एक क्षणभर घोटाळून, मग एकदम बोलून टाकतो.) इतर डायरेक्टर बहुमतान आपणाला राजीनामा द्यायला भाग पाडतील, असा माझा कयास आहे, साहेब !

**बाबासाहेब** : (निर्विकारपणें) तुम्ही जेवायला जा, कुळकर्णी. बाबाजीला इथ पाठवून द्या.

**कुळकर्णी** : (आत जाता जाता वळून) आपल्याबद्दलच्या आदरामुळेच मी हें सर्व बोललों, साहेब. (आत जातो. बाबासाहेब उग्र चेहरा करून बसले आहेत बाबाजी प्रवेश करतो.)

**बाबाजी** : जेवणापूर्वी लिंबाच सरबत घेणार ना, मोठेसाहेब ?

**बाबासाहेब** : मला जेवायचं नाहीं म्हणून ताईला साग, बाबाजी. इतराना जेऊन घेऊ द्या. मला एक कप गरम कॉफी घेऊन ये.

[ बाबाजी त्यांच्या चेहऱ्याकडे चिताग्रस्त नजरेनें पाहतो ]

**बाबाजी** : माफ करा, साहेब ! हें काय चालवलय आपण ? जेवण नाही, धड झोप नाहीं. आपल्या प्रकृतीचा तरी विचार करा ! या संपानं तुम्हाला अर्ध केल. वीस वर्ष मुंबईत तुमची चाकरी केली. आता दहा वर्ष ताई-कडे आहें, साहेब ! तुम्हाला इतके थकलेले मीं कधीच पाहिले नाहीत—

**बाबासाहेब** : मला काहीं झालेल नाहीं, बाबाजी.

**बाबाजी** : या सपान तुमच्यावर भलताच ताण—मिटवून टाका हा संप, साहेब, एकदाचा—

**बाबासाहेब** : (उग्र चेहरा करून) बाबाजी, कॉफी घेऊन ये.

**बाबाजी** : आणतो साहेब ! (त्याच्याकडे दीनवाण्या नजरेनें पाहात आत जातो. बाबासाहेब उग्र चेहरा करून समोर पाहतात. एक मोठा श्वास टाकतात, तसा पडदा खाली येतो. )

# २

## दृश्य १ लें

[ कामगारवस्तीतली जाधवाची खोली. दुपारची अडीच तीनची वेळ आहे खाटेवर आजारी गिरिजा जाधव बसली आहे. चुलीच्या ओट्या-जवळ गीता आहे पवारीण, साटमीण, साखळकरीण, पवारीण आजी वगैरे कामगार स्त्रिया गिरिजेची वास्तपुस्त करायला आलेल्या आहेत ]

**साटमीण :** (ओटींतून दोन मुठी लाह्या काढून गीतेकडे देत) गिरिजाबाई, तुला काहीं खाववत नाहीं ना ? दुधात घालून ह्या लाह्या खा. पचायला अगदीं हलक्या बघ—पोरासाठीं यानीं सकाळीं आणून ठेवल्यात.

**गिरिजा :** काय हें, साटमिणी ? तिकडे तुझीं पोरं भूक भूक करतात नि त्याच्या तोंडातल्या काढून या मला ग कशाला ?

**साटमीण :** त्याच्या तोंडातल्या कुणीं काढल्यात? भलतच काय बोलतेस गिरिजाबाई ? पुष्कळ आहेत पोरासाठीं. खरंच, दुधात घालून खा त ह्या लाह्या—

**गीता :** दोन महिन्याचे पैसे नाहीं दिले म्हणून दूधवाल्यानं बंद केलं

गिरिजाबाईचं दूध, साटमिणी !

**पवारीण आजी** : दूधवाले, दाणेवाले, सगळे मेले सारखेच ! साखर-पाण्यातून खा तूं लाह्या, गिरिजा--

**साखळकरीण** : (औपरोधिकपणें) साखरेची पोतीं पडलींच आहेत घरात ! साखरेचा कारखाना आपलाच आहे—

**पवारीण आजी** : तुझं तें घालून पाडून बोलणं राहू दे ग !—तिच्या पोटात काहीं तरी गेलं पाहिजे ना ? जीव सारखा घाबरतोय् तिचा—नि पोटात काहीं नसल कीं जास्तच घाबरणार—

**साटमीण** : गिरिजाबाई तर आजारीच आहे, पण चागल्याचागल्याचाहि जीव भुकेन घाबरतो हो, आजी ! शितूला शाळेंत जाऊं नको म्हणून सागितलय् मी कालपासून--

**पवारीण आजी** : का ग ?

**साटमीण** : काहीं खाल्ल्याशिवाय परवा शाळेंत गेला होता—तासभर बसल्यावर मला काही होतय् म्हणून रडायला लागला शाळेंत. मास्तरानी पाठवून दिला घरीं परत.

**साखळकरीण** : या संपान एकमेकाना चावून खायची वेळ आलीय् ! पुरुषाचा तर उलटाच न्याय ! यानीं सप केलाय्, पण मालकाविरुद्ध काहीं चालत नाही म्हणून राग काढतायृत बायकावर ! चहा पचपचीत झाला म्हणून माझ्या अंगावर यानीं लाकूड उगारल !

**पवारीण आजी** : झिलगे तरी काय करणार ? घरात बसून बसून डोक कुजतं त्याच. पुरुषाना नेहमीं काम पाहिजे.

**गीता** : सागितलं होत कुणी सोडायला काम ?

**पवारीण आजी** : पुरे झाला ग तुमचा तोंडाळपणा. तिच्या समोर कशाला कचकच करता ? आधींच तिला बर नाही. तू पडून राहा ग, गिरिजा. मला बोलाव काहीं हव नको असल तर—चला ग. पडू दे तिला. (त्या जायला उठतात.)

**साखळकरीण** : गीता काय करतेय् चुलीकडे, पवारीण आजी ?

**पवारीण आजी :** पेज करतेय् गिरिजेसाठीं.

**गिरिजा :** कालपासून माझ्यान अगदींच उठवत नाही. आजीबाईनीं गीतेला पाठविल म्हणून पेज तरी पडतेय् तोडात.

**पवारीण आजी :** पुरे, पुरे! (पवारीण आजी, साखळकरीण, साटमीण जायला निघतात. दरवाजातून बाहेर पडताना आजीचा झोक जातो. तिला इतर बायका सावरतात. गीता धावते.)

**गीता :** सासूबाईना भोवळ आली कीं काय?

**पवारीणआजी :** (स्वतःला सावरीत) छे ग, काही नाहीं. तू जा. (गीते-खेरीज बाकीच्या पवारीणआजीसह जातात.)

**गिरिजा :** खरंच भोवळ आली कीं काय आजीला, गीता?

**गीता :** कुणाला ठाऊक? पण अलीकडे अस होतं खरं त्याना—घरात सगळ्यानाच अर्धपोटी राहावं लागत. तेव्हा आज उपासच आहे, आज भूकच नाहीं, अस काहीं तरी सागून त्या दोन दोन दिवस काही खातच नाहींत. मग असं डोक गरगरत. दुसर काय? (एकदम सतापून) ऐकलत, गिरिजाबाई? याना नि राजाभावोजींना पण काल मी बजावून सागितलय कीं म्हातारीला नि मला मारून तरी टाका नाहीं तर हा संप तरी मिटवून टाका. आमच्याच्यानी नाहीं सहन करवत आता हें. स्वतःच्या पोटात नाही गेल काहीं तरी चालेल मेल, पण पुरुषाच्या नि पोराच्या सुकून गेलेल्या तोडाकडे नाहीं बघवत आपल्याच्यानीं! ते म्हणतात काय, संप काय मजा म्हणून केलाय आम्हीं?—मग मिटवून टाका तर, मी म्हटल! ते म्हणतात, तो मिटवण न मिटवण हे जाधवाच्या हातात—त्याला दगा नाहीं देणार आम्ही. पुढारी म्हणजे पुढारी! जाधव—जाधव—जाधव! सगळ्या काम-गाराची हाड मसणात गेल्यावर कुणासाठीं मिटवणार आहेत संप जाधव? सगळे कामगार घरी आले, कीं काहीं ना काहीं करून संप आतां मिटेल तर बरं असं कुरकुरतात; पण सभेत जाधवाच्या समोर गेले कीं सगळयांच्या अंगात कसा समध संचरतो! जाधव, जाधव—(काहीं क्षण स्तब्धता. गिरिजा अस्वस्थ होते.) तुमच मन मला समजत, गिरिजाबाई. जाधवांचंच म्हणणं खरं व्हाव, त्यांचच सर्वानीं ऐकावं असं तुम्हाला वाटण साहजिक

आहे. पण मी—मीच याना नि राजाभावोजींना आता बजावून सांगणार आहे कीं, जाधवाचं पुढारीपण खूप झाल—तुम्ही नाहीं तर दुसऱ्या कुणी तरी पुढारीपण घेऊन हा संप आता मिटवून टाका. बाबासुद्धा जाधवाच्या हटवादीपणाला आता विटलेत. सगळेच विटलेत—बोलायला कुणाला धीर होत नाहीं.

**गिरिजा** : काय जावजीमास्तरसुद्धा याच्याविरुद्ध जातील ?

**गीता** : सगळेच जातील—दुसरा कुणी पुढें झाला तर.

**गिरिजा** : मला नाही वाटत याच्यासमोर दुसरा कुणी पुढ होईल अस.

**गीता** : मी पुढ होईन! मीं निश्चय केलाय सभेत जाऊन सागायचा—जाधवाना बाजूला सारून सप मिटवून तरी टाका, नाही तर आपल्या बायकापोराच्या गळ्याना फास लावून त्याना एकदम मारून तरी टाका—अस हालहाल होऊन तडफडून मरायचा वीट आलाय् आम्हाला!

**गिरिजा** : गीता, गीता !

**गीता** : गीता गीता काय, गिरिजाबाई ? तुमच्या चेहऱ्याकडे गेल्या कित्येक दिवसात नीट न्याहाळून पाहिलंय का जाधवानीं ? काहीं रक्त उरल का ? इतराच राहो पण स्वतःच्या बायकोच्या जिवाचं याना काहीं आहे कीं नाहीं ? ते काहीं नाहीं. फेडरेशनचे माने आज चार वाजता कामगाराना भेटणार आहेत, त्या वेळीं जाधवाचं काहीं चालू देता कामा नये कामगारानीं—

**गिरिजा** : भट्टीखात्यातल्या लोकाचा जाधव कधींच विश्वासघात करणार नाहींत !—

**गीता** : भट्टीखात्याच उगीच नाव. —मी नि माझा शब्द यापुढं जाधवाना काहीं दिसत नाहीं.

[दारावर टकटक ऐकू येते. दार उघडून दया आंत येते. उन्हांतून आल्यामुळें ती घामाघूम झाली आहे. तिचा चेहरा तांबडा झाला आहे. हातांतली छत्री कोपऱ्यांत ठेवते.]

**दया** : कसं आहे तुझ, गिरिजा ?

**गिरिजा** : इतक्या या उन्हातून इकडं कुठ, ताईसाहेब ? गीता, ती खुर्ची

दे त्याना. (गीता फणकाऱ्यात खुर्ची पुढें करते.) बसा ना, ताईसाहेब (दया बसते.)

**दया** : (गीता तिथच उभी असलेली पाहून तिनें बाहेर जावें अशा अपेक्षे तिच्याकडे पहात) गिरिजा, परवा बाबाजीबरोबर साबूदाण्याची खीर तुझ्या कडे पाठविली होती ती परत का पाठवलीस ? तूं असं करशील असं मल वाटल नव्हतं.

**गिरिजा** : माझ्यान तसल काही खाववत नाहीं, ताईसाहेब. पेजेवर आहे मी सध्या.

**दया** : माझ्या लक्षात आलं ! तू नाहीं पाठविलीस परत. जाधवरावाचं का तें. होय ना ? कामगाराच्या बायकामुलाचें हे असे हाल चालले असतान जाधवरावाना त्याच काहींच कसं वाटत नाहीं ?

**गीता** : कुणी सागितल तुम्हाला आमचे हाल चाललेत म्हणून ?

**दया** : (चमकून) तूं कोण ?

**गीता** : मी कुणीहि असेन. सागितलं कुणी तुम्हाला आमचे हाल चालले म्हणून ?

**गिरिजा** : गीता ?

**गीता** : आधीं उपाशी मारायच, नि मग प्राण लवकर जाऊ नयेत म्हणू खी पाठवायची ! बाईसाहेब, तुमचे उपकार तुमच्याजवळच राहू द्या. उपकारा सोंग आणून बातम्या काढायला येऊ नका यापुढ आमच्या वस्तींत.

**दया** : (संतापानें तिच्याकडे पहात) तुझ्याशीं बोलायची माझी इच्छा नाहीं.

**गीता** : (रागानें थरथरत) पण माझी तुम्हाला ऐकवायची इच्छा आहे नाटक बघायला नटून थटून जाता, तसे आमचे हाल बघायला इथं येत काय ?

**दया** : (बेपर्वा आवाजात) हें घर तुझं नाहीं.

**गीता** : (बाहेर जायला वळत) माझ्या घरीं या, म्हणजे दाखवते मजा (जाते)

**गिरिजा** : तुम्ही लक्ष देऊं नका तिच्याकडे, ताईसाहेब. तशी चांगली मुलग

आहे गीता. पण संपानं सगळ्यांचींच डोकीं फिरलींत.

**दया :** उगाच काही तरी गैरसमज करून घेतात. कामगार काय किंवा त्याच्या बायका काय—त्याना काहीं समजत नाहीं.

**गिरिजा :** (स्मित करीत) खरं आहे, ताईसाहेब.

**दया :** तस नव्हे, गिरिजा, सगळ्याच्यासंबंधीं बोलत नाहीं मी. ते असो—जाधव अजून घरीं आले नाहीत?

**गिरिजा :** नाहीं.

**दया :** जाधवाच्या मनांत असेल तर आत्ता तडजोड होईल. पण या माणसाला मुळीं कसलीच तडजोड नको!

**गिरिजा :** लोक म्हणतात कीं तुमच्या वडलाना—बाबासाहेबाना कसली तडजोड नको.

**दया :** म्हातारीं माणसं फार हट्टी असतात, गिरिजा, नि जास्त म्हातारी होतात तशीं जास्तच हट्टी होतात. तू म्हणतेस तें खर आहे. एका बाजूला जाधव असे हट्टाला पेटलेत तसच दुसऱ्या बाजूला बाबाहि हट्टाला पेटलेत. पण बाबा तसे वाईट नाहींत—तुला माहीत आहे, गिरिजा? तुझ्या औषध-पाण्याला लागतील ते पैसे नेऊन दे हणून आत्ताच त्यानीं सागितल.

**गिरिजा :** बाबासाहेब किती दयाळू आहेत ते माहीत आहे मला, ताईसाहेब.

**दया :** तूं ती खीर परत पाठवायला नको होतीस, गिरिजा. ती गीता की कोण—ती इथ काय करीत होती मघाशीं?

**गिरिजा :** मला उठवत नाहीं अलीकडे दोन दिवस—पेज करून ठेवते ती माझ्यासाठीं. हेहि पेजच घेतात. आज सकाळीं चहा घेऊन गेले ते अजून आलेच नाहींत. इतक्यात येतील कदाचित्.

**दया :** फेडरेशनचा माने आज आत्ता कामगाराना भेटणार आहे म्हणे काही तडजोड होते का पाहण्यासाठीं. तिकडे जाण्यापूर्वी जाधव आले तर तूं तरी त्याना चार शब्द साग, गिरिजा. नाहीं तर नेहमींप्रमाणें कामगाराना भडकवून मानेचे सगळे बेत उधळून लावतील जाधव! कधीं सागून पाह्यलयुस का? (गिरिजा स्मित करते.) तुझ्या प्रकृतीचं काय झालंय् त्याची काहीं कल्पना आहे कीं नाहीं जाधवांना?

**गिरिजा :** आपल्या जिवापेक्षा माझी काळजी घेतात ते, ताईसाहेब !

**दया :** आमच्याकडे होतीस तेव्हा कशी खणखणीत होतीस तूं, गिरिजा !

**गिरिजा :** तस काही झालेल नाहीं मला, ताईसाहेब. थोड्या दिवसात चागली खडखडीत होईन मी.

**दया :** पण चागल खाणंपिण, चागल औषधपाणी मिळाल पाहिजे तुला वेळेवर. आमच्या डॉ. बेदरकराना पाठवू का तुला तपासायला ?

**गिरिजा :** पाठवा, पण तशी काहीं जरूर नाही. ह्यानीं आणल होत एका डॉक्टरला.

**दया :** ती गीता कीं कोण ती तिला वाटत, कामगाराच्या हालअपेष्टाच आम्हाला काहीच वाटत नाही. आम्हाला खूप वाटत. पण कामगार भारीच ताणून धरताहेत.

**गिरिजा :** कामगार म्हणतात, इतक ताणून धरल्याशिवाय पुरेसा पगार कधी जन्मात मिळणार नाही.

**दया :** अग, फेडरेशनलासुद्धा त्याच्या मागण्या फारच वाटतात. म्हणून तर संपाचा पाठिंबा त्यानीं काढून घेतला. हे मॅनेजर असले तरी नेहमीं कामगाराची बाजू घेतात, पण या खेपेला हेहि म्हणतात कीं इतर कारखान्याच्या मानान आमचे पगार मुळींच कमी नाहींत.

**गिरिजा :** कमी नाहीत ?

**दया :** नाहीत ग. वाटेल तसे पगार दिले तर कारखाना बंदच करावा लागेल.

**गिरिजा :** पण दर वर्षी किती तरी नफा कपनी वाटते म्हणे.

**दया :** शेअर-होल्डराना काही मिळायला नको का ? शेअर-होल्डर काहीं श्रीमंत नसतात. बऱ्याचशा मध्यम वर्गातल्या शेअर होल्डराची कामगारापेक्षाहि वाईट स्थिति असते. मात्र मिशीला तूप लावून पाढरपेशेपणाचा त्याना देखावा करावा लागतो इतकच !

**गिरिजा :** अस्सं !

**दया :** कामगाराना तसा काहींच खर्च नसतो. मिळवतात पाढरपेशाइतकच —केव्हा केव्हा जास्तच, पण भाड्यातोड्याचा, कपडा-लत्याचा खर्च किती तरी कमी नाहीं का ? तमाशा, तंबाखू, ताडीमाडीवर पैसे उडवतात

म्हणून, नाहीं तर कामगारांना पगार पुरायला काहींच हरकत नाही.

**गिरिजा :** कामानं इतके थकून जातात कामगार, ताईसाहेब, कीं थोडी ताडीमाडी घेतल्याशिवाय तरतरीच वाटत नाहीं ते म्हणतात.

**दया :** पण म्हणून असल घाणेरड व्यसन—

**गिरिजा :** हे तर पान-तंबाखूच काय पण सुपारीसुद्धा खात नाहींत.

**दया :** जाधवाची गोष्ट वेगळीं आहे ग. ते मेकॅनिक् आहेत—साधे कामगार नाहींत.

**गिरिजा :** हे नेहमी म्हणतात कीं कामगार अगदी नाइलाज म्हणून व्यसनी होतात.

**दया :** कामगाराना काम खूप करावं लागत, त्याची कल्पना आहे मला.

**गिरिजा :** काहींच काम न करता व्यसन करणाऱ्या ऐतखाऊच्या मानान कामगार मुळींच व्यसनी नाहींत असं म्हणाव लागेल !

**दया :** (हसून) कामगार नसलेले सगळेच ऐतखाऊ नि सगळेच चैनी असतात ही तुम्हा लोकाची अगदी खुळीं कल्पना आहे, गिरिजा. सत्य-नारायण, भजनपाटर्या—कामगार काय कमी चैन करतात ?

**गिरिजा :** हे म्हणतात, कामगाराच्या सगळया चैनी कालची नि उद्याची चिंता विसरण्याकरिता असतात. कामगार फक्त आजचा विचार करतात.

**दया :** ही म्हणजे जुगाऱ्याची वृत्ति झाली.

**गिरिजा :** हे म्हणतातच मुळीं कीं कामगाराच सारं जिणच जुगार आहे. जन्मापासून मरेपर्यंत एक लाबच लाब, न सपणारा जुगार! (बोलता बोलता ती भावनाविवश होते.) कामगारकुटुंबातली रात-दिवसाची चिता एकच कीं झालेलें पोर कसं जगवायच, जगलेल कसं पोसायच ?—नि तें पोर मोठं झाल कीं त्याच्यामागे पुन्हा तोच घोर. हे म्हणतात, असल्या या राक्षसी समाजपद्धतीच्या जबडयात लोटायला नवे नवे घास निर्माणच मुळीं कशाला करायचे ! कामगारानीं नवीन पोर जन्माला घालायच म्हणजे या राक्षसणीसाठीं एक बळीच वाढून ठेवायचा. ताईसाहेब, मला मुलाची फार आवड आहे हो ! एखाद गोंडस बाळ माझ्या कुशीत असाव अस

मला किती तरी वाटे! पण—पण—याची मतं फार—फारच भडक आहेत.

[ तिला दम लागतो ]

**दया :** आल माझ्या लक्षात, गिरिजा. तू उगीच जास्त बोलून स्वतःला त्रास करून घेऊ नकोस.

**गिरिजा :** नाहीं येणार तुमच्या लक्षात, ताईसाहेब. तुम्हाला मुल आहेत. पण त्याच उद्या काय होईल याची तुम्हाला मुळींच चिंता करायला नको.

**दया :** बाकीच्या कामगाराची गोष्ट राहू द्या. पण तुमची इतकी वाईट स्थिति असण्याच काहींच कारण नव्हतं. मेकॅनिक् म्हणून जाधवाना पगार चागलाच असणार—नि पुन्हा जाधवानीं यत्रात सुधारणा सुचविली म्हणून एक हजार रुपयांच त्याना बक्षीस दिल होत कपनीन, होय ना?

**गिरिजा :** तो सगळा पैसा यानी कामगाराच्या सप-फडाला देऊन टाकला. थोडे शिल्लक होते पैसे तेहि या चार महिन्यात स्वतःपेक्षासुद्धा इतरासाठीच खर्च झाले. कामगाराची अन्नान्नदशा झाली असताना स्वतःजवळ पैसे राखून ठेवण पाप आहे, हे म्हणतात.

**दया :** तें ठीक आहे ग. पण तुझ्या या आजाराचा जाधवानी विचार केलाय् कीं नाही? औषधाला, दूधपाण्याला पैसे नकोत का? छे, छे! हा सप म्हणजे—(इकडे तिकडे पाहते. चुलीकडे लक्ष जाते) तुझ्यासाठीं तिन मघाशी पेज करून ठेवलीय् ती तुला घ्यायची असेल? देऊ का काढून? (उठते.)

**गिरिजा :** नको, नको, ताईसाहेब. वेळ आहे पेज घ्यायला मला. (पावलाचा आवाज येतो आहे का पाहात) हे यायची वेळ झाली आहे, ताईसाहेब. तुम्हाला इथ पाहिल तर डोक फिरवून घेतील ते.

**दया :** खर सागायच म्हणजे जाधवरावानाच भेटायला आलेंय् मी, गिरिजा. हा सप मिटलाच पाहिजे! पाहणार आहे सागून मी त्याना.

**गिरिजा :** छे, छे, ताईसाहेब, ते मुळींच ऐकणार नाहीत. आपल्या सगळ्या मागण्या मिळविण्यासाठीं प्राण पणाला लावलेत त्यानी—

**दया :** पहाते प्रयत्न करून.

**गिरिजा :** ताईसाहेब, नको—(दयेची दाराकडे पाठ आहे. दार उघडून

आत आलेले जाधव तिला दिसत नाहींत. गिरिजा त्याला पाहून दचकते.)

**जाधव :** फार बडे पाहुणे आज तुला भेटायला आलेले दिसताहेत, गिरिजा !

**दया :** जाधवराव, मला तुमच्याशीं काहीं महत्त्वाच्या विषयावर बोलायचंय्.

**जाधव :** माझ्या घरात पायधूळ झाडायला आलेल्या आपण कोण आहात त्याची मला कल्पना नाहीं.

**दया :** मी दया देशमुख. मॅनेजर देशमुखाची पत्नी—

**जाधव :** ह !—चेअरमन् सुभेदारसाहेबाच्या कन्या !

**दया :** मुद्दाम तुमच्याशीं बोलायला आलेंय् मी, जाधवराव.

**जाधव :** (कोट काढून ठेवीत) तुमच्याशी बोलण्यासारखं माझ्यापाशी काहीं नाहीं, बाईसाहेब.

**दया :** मी बोलल्याशिवाय जाणार नाहीं, जाधव !

**जाधव :** मला वेळ नाहीं तुमच्याशीं बोलायला.

**गिरिजा :** असं काय करता हो ?

**दया :** मला काय म्हणायचंय् तें तरी ऐका—

**जाधव :** सुभेदारसाहेबाच्या कन्येला नाहीं म्हणताना वाईट वाटतय् मला, पण मी ऐकूं इच्छीत नाहीं.

**दया :** (क्षणभर घोटाळते. पण नतर निश्चयपूर्वक स्वरात) आता चार वाजता फेडरेशनचे प्रमुख माने मिस्टर देशमुखाना भेटणार आहेत. या भेटींत अखेरचा काय तो निर्णय ठरणार आहे. तुम्ही त्या वेळीं तिथ असणारच. (तो मान हलवतो) मला तुम्हाला जीव तोडून विनति करायचीय्, जाधवराव, हा सप मिटू द्या एकदाचा—तुमच्या हातात आहे सर्व काहीं. थोडीशी पड घ्या—हालात दिवस काढणाऱ्या कामगारासाठी—स्वतःसाठीं —स्वतःच्या बायकोसाठीं तरी तुम्ही एवढ कराच—थोडी पड घ्या.

**जाधव :** सुभेदारसाहेबाच्या कन्या मला पड घ्यायच्या गोष्टी सागताहेत, नि तेंसुद्धा कामगारासाठीं—माझ्यासाठीं—माझ्या बायकोसाठीं—अं !

**दया :** होय, निदान तुमच्या बायकोसाठीं तरी—सर्वांचसाठीं, जाधवराव.

**जाधव :** सर्वांचसाठीं—विशेषतः सुभेदारसाहेबांसाठीं, नाहीं का ?

दया : बाबाना असे अगदीं पाण्यात का पाहता तुम्ही ? काय केलय् त्यानीं तुमच ?

जाधव : काहींच केलेल नाहीं !

दया : तुमचीं मत जशीं कडक आहेत, तशींच त्याचीहि कडक आहेत. त्याला ते काय करणार ?

जाधव : आपल्यासारख्याच्या तोंडून कामगारानाहि मत असतात,—असू शकतात—हें ऐकून बर वाटल मला !

दया : (भावनापूर्ण स्वरात) जाधवराव, बाबाच आता वय झालय्,—तुम्ही त्याच्या—(तो तिच्याकडे रोखून पाहू लागतो म्हणून ती थाबते.)

जाधव : स्पष्ट बोलतो याबद्दल माफ करा, बाईसाहेब. सुभेदारसाहेब म्हणजे मूर्तिमत भाडवलशाही. ते कुठ बुडत असले नि माझ्या करगळीच्या आधारान ते बचावू शकत असले तर तेवढी करंगळीहि मी पुढ करणार नाही.

दया : काय बोलता आहात तुम्ही, जाधव !—(दातानी ती ओठ दाबून धरते.)

जाधव : अगदीं खर तेंच बोलतोय्—

दया : मला नाहीं वाटत.

जाधव : मला त्याच्याबद्दल यत्किंचितहि दया वाटणार नाहीं.

दया : पण का ?

जाधव : (दात ओठ खात) कामगाराना चिरडून टाकण हेच आपलं अवतारकार्य आहे असं सुभेदारसाहेब समजतात ! (तो संतापान थरथरतो आहे. गिरिजा त्याला आवरण्याकरिता उठण्याचा प्रयत्न करते, पण बिछान्यावरच पडते.)

दया : गिरिजा ! (तिच्याजवळ जाते.)

जाधव : मेहरबानी करून माझ्या बायकोच्या अंगाला आपला हात लावू नका !

दया : (त्याच्या शब्दाचा किळस येऊन ती मागे सरते ) तुम्हाला—तुम्हांला वेड लागलय्, जाधव !

जाधव : वेडा वावरतो त्या घरात आपल्यासारख्या नाजुक स्त्रीन थाबण बरं नाहीं.

**दया** : तुम्हाला मी मुळींच भीत नाही.

**जाधव** : छे, छे, सुभेदाराचं रक्त कुणाला भिणार नाहीं, याबद्दल माझी खात्री आहे. इतर सटरफटर भाडवलदारासारखे सुभेदारसाहेब भेकड नाहींत.

**दया** : (एकदम) तुमची शूरपणाची कल्पना म्हणजे--काहीं होवो, लढा चालू ठेवण, यत्किंचितहि माघार न घेणं ! होय ना ?

**जाधव** : असहाय बायकापोराना जेरीला आणण, ही सुभेदारसाहेबाची शूर-पणाची कल्पना आहे, होय ना ? गरीब बायाबापड्याना नि अजाण अर्भकाना भुकेन तडफडायला लावण हेच सुभेदारसाहेबाचं शौर्य कीं नाहीं ?

**दया** : काहीं तरी बोलूं नका. बाबाची काहीं तत्त्व आहेत, नि प्राण गेला तरी तीं ते सोडणार नाहींत, हें तुम्हाला पूर्णपणें माहीत आहे.

**जाधव** : मलाहि काहीं तत्त्वं आहेत, नि मीहि ती प्राण गेला तरी सोडणार नाहीं, हे तुम्ही खूप समजून असा.

**दया** : तुम्हाला आमचा इतका द्वेष वाटतो कीं, एखाद्या योग्य कारणासाठीं सुद्धा तुम्ही आमच्यासमोर माघार घ्यायला तयार होणार नाहीं.

**जाधव** : छप्पन्न योग्य कारणासाठीं सुद्धा सुभेदारसाहेब आमच्यासमोर कधी माघार घेणार नाहींत.

**दया** : ठीक आहे ! जातें मी. बिचाऱ्या गिरिजेसाठीं तरी काहीं विचार करा.

**जाधव** : ते पाहीन मी. (ती जायला वळते. दारावर थाप ऐकूं येते. दार उघडून देशमुख आत येतात. दया त्याच्याजवळ जाते; पण काय करावें ते तिला सुचत नाहीं.)

**देशमुख** : दया, तू इथ काय करतेस ?

**जाधव** : देशमुखसाहेब, इतक अगदीं धावत यायच काहीं कारण नव्हत. मॅनेजरीणबाई काहीं गुडाच्या गराड्यात सापडलेल्या नव्हत्या.

**देशमुख** : कामगाराना मी गुड समजत नाहीं, हें तुला माहीत आहे, जाधव. कस आहे गिरिजाबाईच ? (जाधव काहींच उत्तर देत नाहीं.) घरीं चल, दया.

**दया** : जाते मी. स्वतःच्या बायकोकडे पाहून तरी आपला हट्ट आवरा, जाधव.

**जाधव** : आपल्या वडिलाकडे आणि पतीकडे पाहून काहीं करायला का नाहीं सागत तुम्ही मला, बाईसाहेब ?

[ त्याला उलटून उत्तर देण्याचा मोह ती आवरते आणि बाहेर पडते तिच्यामागून देशमुख बाहेर पडतात ]

**जाधव** : (जवळ जाऊन तिच्या पाठीवरून हात फिरवतो.) बर आहे ना तुझ, गिरिजा ? आज सगळया डायरेक्टराचे चेहरे अगदी जवळून पाहायला मिळाले गिरिजा. त्या म्हाताऱ्या डाकूखेरीज बाकी सगळयाची लढायची खुमखुमी खलास झालेली दिसली मला. तो मात्र होता तसा ताठ आहे.

**गिरिजा** : तुम्हाला परत सभेला जायचंय् ना माऱ्याच्या ? सकाळपासून काहीं खाल्लेल नाही तुम्हीं. गीतेनं पेज करून ठेवलीय् ती घेऊन जा. मीहि घेईन थोडी.

**जाधव** : मुबईहून आलेले ते भामटे इथ असेपर्यंत मला कुटल खायला सुचणार ? घशाखाली काही उतरतच नाही. (इकडेतिकडे फेऱ्या मारतो.) आमच्या लोकाचाहि मला राग यायला लागलाय् ! आजच्या सभेत त्याना ताठ ठेवण मलाहि जड जाणार आहे. डळमळायला लागलेत लेकाचे— भागुबाई कुठले ! आज मिळेल ते खर—उद्याचा विचार नाही. घाण्याच्या बैलानासुद्धा एकवेळ पलीकडे पाहता येईल, पण याना नाही !

**गिरिजा** : बायकाचा आता धीर सुटलाय्—हो, त्या त्याना आता पुरे म्हणून सागतायत्.

**जाधव** : अस्सं ? बायका सागताहेत म्हणून लटपटायला लागलेत हे ? बायकाच नाव पुढं करताहेत भागूबाई ! गुत्त्यात जाऊ नका, तमाशा पाहू नका म्हणून बायका कपाळ फोडून सागत, तें कधीं ऐकत नव्हते ते ! आता साऱ्या कामगारवर्गाच्या भवितव्यासाठीं थोडी कळ सोसायचा प्रश्न आल्याबरोबर आता बायका आठवायला लागल्या !

**गिरिजा** : पोराचे हाल आता बघवेनासे झालेत सगळयाना—

**जाधव** : पोरं ! हूः ! स्वतः खातेऱ्यात लोळत असताना त्याच खातेऱ्यात लोळायला आणखी किडे घालतात कशाला जन्माला ?

**गिरिजा** : (रडकुडीला येऊन) नका हो बोलू अस मुलाबाळासंबधीं—

**जाधव** : (तिच्या चेहऱ्याकडे रोखून पाहात) अग, अग—अशी रडतेस काय ?

**गिरिजा** : छे, रडतेय् कुठ ?

**जाधव** : आमच्या लोकाच्या आधळेपणाचा मला राग येतो, गिरिजा. आजच्या पुढ उद्या त्याना दिसतच नाहीं. मिळवल तें उडवल. आजची मजा आज. उद्या गेला उडत! हैराण झालोंय मी त्याना सागून सागून. संपाच्या सुरुवातीला ऐकत होते माझं सगळ—आता खरी परीक्षेची वेळ आलीय् तेव्हा लटपटायला लागलेत.

**गिरिजा** : माणसं आहेत तीं—लोखडाचे पुतळे नाहीत. माणसाच्या सहन-शक्तीला काहीं मर्यादा असते.

**जाधव** : मीहि माणूसच आहें. मीहि अर्धपोटीं दिवस काढतोंय्, पण प्राण गेले तरी मी वाकणार नाहीं. मला शक्य झालय् तें याना का शक्य होऊं नये ?

**गिरिजा** : मी पुन्हा सागते, कामगाराच्या बायाबापड्या अगदीं कावून गेल्यात—

**जाधव** : बायकाचा या संपाशीं काहीं सबध नाहीं.

**गिरिजा** : नाहीं—तुम्हीं सप करायचा नि बायकापोरानी तडफडून तडफडून मरून जायचं !

**जाधव** : ( तिची नजर चुकवीत ) कोणी मरत नाहीं—त्या भामटयाना पुरे लोळवीपर्यंत आमच्यातल कोणी मरत नाहीं. ( तिच्या चेहऱ्याकडे पाहतो. पुन्हा नजर फिरवून ) गेले कित्येक महिने सारे प्राण एकवटून ज्याची मी वाट पहात होतों तो नामी प्रसग आता आलाय्. मुबई-पुण्याच्या या डायरेक्टर डाकूना इथ हेलपाटा घालायला लावायच नि हात हालवीत परत पाठवायच ! आज त्याचे चेहरे अगदीं जवळून न्याहाळून पाहिलेत मीं. गिरिजा, हार खाल्लेल्या—मार खाल्लेल्या माणसाचे चेहरे होते ते. बस्स, आणखी थोड ताणल कीं, कोलमडणार ! जातों मी. सभेच्या आधींच तिथ पोहोंचल पाहिजे मला.

**गिरिजा** : तुमच्या पोटात कांही नाहीं. तेवढी पेज घेऊन जा—

**जाधव** : (तिच्याजवळ जाऊन) तू कांहीं काळजी करू नकोस, गिरिजा—विजय अगदीं जवळ आलाय्! मी येतोच थोड्या वेळानं—तू स्वस्थ राहा.

[ तिच्या अगावरल पांघरूण नीट करतो. तिच्या तोंडावर हात फिरवतो, आणि जायला वळतो. दारात बारक्या भेटतो. त्याच्या हातात एक शिट्टी आहे. ]

**जाधव** : काय रे, बारक्या? (जातो)

[ बारक्या गिरिजेच्या खाटेजवळ जाऊन तिच्याकडे पाहात राहतो. ]

**गिरिजा** : काय रे, बारक्या?

**बारक्या** : आजोबा येतायुत इकडे. मामीबी येतेय्. (खुर्चीवर बसतो, इकडे तिकडे पाहतो. दोनतीनदा हळूच शिट्टी वाजवितो. जावजीमास्तर येतात.)

**जावजी** : बरी दिसतेय् तुझी परकुरती आज, गिरिजे.

**गिरिजा** : बर आहे, आजोबा.

**जावजी** : (भीत भीत) जाधव कुठ गेला?

**गिरिजा** : हे आत्ताच गेले कीं सभेसाठीं.

**जावजी** : (सुटकेच्या स्वरात) हवा होता तो मला इथ. हे बघ, पोरी, मी त्याला सागायला आलो होतो कीं आता पुरे झाल ताणण! मुद्दाम मुबईहून आलेत शेट लोक तडजोडीसाठी—काहीं तरी करून मिटवून टाकाव आता समद. तो हवा होता इथ—आता सभेत आपटील हातपाय, पण मोडून घेईल एखादे वेळीं.

**गिरिजा** : ते मोडले तरी वाकणार नाहींत, आजोबा.

**जावजी** : तूं स्वस्थ राहा पोरी—उगाच त्रास करून घेऊ नकोस. पन तुला आपलं माहीत असलेलं बर—भट्टीखात्यातले लोक नि शिवा पवार हेंच्याबिगर जाधवाच्या बाजूला आता कोण नाय. बायकापोराचे लई हाल होतायुत. आता देवच कोपलाय्. उगीच हातपाय झाडण्यात काय हाशील नाय. काय बी करून आता संप मिटवला पाहिजे, असं मला परमानिकपने वाटत.

**गिरिजा** : (घाबरी झाली आहे, पण शक्य तितक बळ एकवटून) तुम्ही सगळे अस म्हणायला लागलात तर यांचं काय होईल ?

**जावजी** : काय बी होनार नाय. तेच्यात काय कमीपना हाय? मानसाला ज्ये ज्ये म्हनून करता येन्यासारख्र होत, ते जाधवान केल. असा एखादाच लढणारा—पन आता दैवच फिरलय् ना ! (बारक्या शिट्टी वाजवतो) गप्प बस रे पोरा. जातो मी आता. सभेची वेळ झाली. (दाराशी जातो.) ही बघ गीता येतेय् तुझ्याकडे, पोरी. (गीता येते.)

**गीता** : (दारातच उभी राहून गॅलरीच्या पलीकडल्या रस्त्याकडे पाहात) लवकर जा, बाबा. सगळे जमलेत सभेला. सभा सुरूहि झाली असेल. (तो जायला लागतो. त्याचा कोट धरून) या खेपेला जाधवाच काहीं चालू देता कामा नये तुम्हीं, बाबा !

**जावजी** : (तिच्या हातातून कोट सोडवून घेत) मला शिकवू नकोस तूं पोरी, ठीक दिसेल ते करीन मी. (जातो. दरवाजा उघडाच आहे. गॅलरींत शिवराम पवार येतो. दोन्ही हात मागे घेऊन गीता ताठ उभी राहते. गिरिजेकडे गीतेची पाठ आहे. शिवराम संत्रस्त दिसतो. ती ओठ दाबून थरथरते आहे.)

**शिवराम** : सभेला जातोय् मी, गीता. (ती काहीं बोलत नाहीं.) गीता, मी सभेला जातोय्. बारक्यासाठीं कुरमुरे घेऊन येतो.

**गीता** : जा, कुत्र्यासारखे जाधवामागून जा, नि येताना मात्र तुमच्या आईसाठीं नि माझ्यासाठीं कसल तरी पटकन् जीव घेणार विष घेऊन या !

**शिवराम** : (तिचे दोन्ही दंड धरून तिला गदगदा हलवतो.) या वेळीं तरी आम्हाला नाउमेद करूं नका तुम्ही बायका ! आता अगदीं जिकायची वेळ आलीय्—जाधवाच्या खांद्याला खांदा लावून उभं राह्यलंच पाहिजे सर्वांनीं.

**गीता** : राहा. नाहीं कुठ म्हणतो आम्ही ? आमची आपली अफू नाहीं तर विष देऊन सोय करा.

**शिवराम** : मग काय संपफोड्या होऊं मी ?

**गीता** : सर्वांना संप माग घ्यायचाय्, पण प्रत्येक जण जाधवाच्या भीतीनं

असं म्हणतोय्. सर्वांनीं संप मागं घ्यायचा ठरविल्यावर कुणीच संपफोडे होत नाहींत.

**शिवराम :** (डोकं हातात धरून) काय करावं मला काहीं सुचत नाहीं.

**गीता :** त्या बहिणीच्या पोराकडे—बारक्याकडे तरी पाहा. पोटच्या पोरासारखा वाढवीन म्हणून बहिणीला मरताना सांगितलंत! भुकेन रडरड रडायचा! आता रडायलाहि येत नाहीं. येणाऱ्या जाणाऱ्याकडे भकास डोळ्यानी बघतो नि खुळ्यासारखा शिट्टी वाजवीत फिरतो. तो रडत नाहीं त्याची भीति वाटते मला—त्याला काहीं तरी झालय्.

**शिवराम :** बस—बस—आज सांगून टाकतो जाधवाला मी. जातो—(तरातरा निघून जातो.)

**गीता :** जाधव जाधव! खूप झालं जाधवाचं बंड! (मागं वळून आत येते. गिरिजा पांढरीफटक होऊन श्वास टाकते आहे.) गिरिजाबाई, गिरिजाबाई, तुम्हाला चक्कर येतेय् कीं काय? (तिचा हात हातात घेते.) तुमचा हात किती थंड पडलाय्! बारक्या, धाव, आजीला म्हणावं, इकडे ये एकदम—

**गिरिजा :** अग, बरी आहें मी—काहीं झालेलं नाहीं मला, गीता. छातींत धडधडू लागलं नि जरा घाबरल्यासारखं झालं.

[ बारक्या शिट्टी वाजवतो ]

**गीता :** अरे, शिट्टी काय वाजवतोस? जा, आजीला बोलाव—

**गिरिजा :** बस रे तू बारक्या! काहीं नको आजी—म्हातारीला कशाला त्रास उगीच? तिला नाहीं चालवत—

**गीता :** काय मेलं बायकाचं जिणं तरी! पुरुषानीं संप लढवायचे—लढे जिकायचे—नि आम्ही इकडे झुरून झुरून मरायचं! (बाहेरून सभेला जाणाऱ्या कामगाराचा गलका ऐकू येतो.) सभेला चाललेत लोक, काय ठरवणार आहेत आज कुणाला ठाऊक!

[ गॅलरींत जाऊन ती दूरवर पाहात राहते. गिरिजा खाटेवर बसून शून्यपणें समोर पाहते. गलका वाढत जातो. हळू हळू अंधार आणि पडदा. ]

# दृश्य २ रें

[ दुपारचे चार वाजून गेले आहेत. आकाश अभ्राच्छादित असल्यामुळें जरा काळोख पडल्यासारखा दिसतो आहे. मागच्या बाजूस एक कालवा असून तेथपासून तों पुढच्या मोकळ्या जागेपर्यंत कारखान्याच्या आवाराची भित दिसते आहे. आजूबाजूला दूरवर पसरलेलीं शेतें आणि अंधुक अधुक टेकड्यांच्या आकृती दिसत आहेत. पुढच्या जागेंत बऱ्याचशा कामगारांची गर्दी जमलेली आहे.

कारखान्याच्या भितीच्या कोनाशी पिपावर फळ्या टाकून एक कामचलाऊ व्यासपीठ तयार केलें आहे. अखिल महाराष्ट्र साखर कामगार फेडरेशनचे मुख्य चिटणीस श्री. माने व्यासपीठावर उभे आहेत. व्यासपीठाच्या बाजूलाच, लोकांपासून जरा दूर अंतरावर भिंतीला टेकून जगदेव जाधव उभा आहे. दूर कालव्याच्या काठाशी दोन गांवकरी सर्व मजा पाहात उभे आहेत ]

**माने :** विचार करून पाहा. फेडरेशनचं म्हणणं काय आहे ते मीं तुमच्यापुढ ठेवलच आहे. यापलीकडे फेडरेशन काहींच करूं शकणार नाहीं.

**यल्लाप्पा :** (रगाने काळा कुळकुळीत असून तोंडावरून धारवाड-कर्नाटकच्या बाजूचा दिसतो.) हे बघा, साहेब, मला काय इचारायचं हाय. आमच्यातल्या काहीं लोकानीं दगाबाजी तर केली नाहीं ना?

**साटम :** (दात चावून धमकीच्या स्वरात) करू द्या तर खरी दगलबाजी कोणाला मन अं—अं—

[जमलेली गर्दी खवळल्यासारखा आवाज येतो ]

**गणू तांबट :** (रुंदट चेहऱ्याचा एक ठेंगणासा कामगार) पण त्याना असलीं दगलबाज माणस सापडणार कुठं?

**साखळकर :** (उंच, तरतरीत, गाल बसलेला, पण भाडखोर चेहऱ्याचा माणूस) अरे, दगलबाजी तर जिकडे तिकडे आहे. त्याची अवलादच तसली मुळीं. वीतभर पोट जाळण्याकरतां शेण खाणारीं माणस काय थोडीं आहेत!

[पुन्हा गर्दीतून संतापलेल्या लोकांची गडबड ऐकू येते वृद्ध जावजीमास्तर सभेंत येतात, आणि अगदी पुढच्या रांगेंत येऊन उभे राहतात.]

**माने :** छे, छे! दगलबाजी सोडून द्या. पण थोडा शांतपणें विचार करा. आज तुमच्या मागण्याप्रमाणें जर फेडरेशन वागूं लागलं तर आणखी दहा संप फेडरेशनच्या मानेवर बसतील. फेडरेशनजवळ फंड किती आहे याची तुम्हाला कल्पना आहेच. सर्वांना न्याय मिळवून देण्यासाठीं फेडरेशन आहे. न्याय म्हणजे कांहीं तुमच्याच बाबतीत न्याय असं नव्हे. सर्वांचाच विचार आम्हाला करावा लागतो. कुणीहि सरळ माणूस तुम्हांला सांगेल कीं तुम्हाला चुकीची चिथावणी मिळते आहे म्हणून. मी असं म्हणत नाहीं कीं तुम्ही वाजवीपेक्षा फाजील मागण्या करता आहां, पण एवढं खास कीं या क्षणीं तुमच्या मागण्या जरा जडच दिसतात. स्वतःला तुम्ही भलत्याच खड्ड्यांत पाडून घेतलंय् खरं. पण आतां त्यांतून सुटका कशी करून घ्यायची याचा विचार नको का करायला? मी सांगतो याचा पूर्ण विचार करा—

**लखू :** (एक धाडसी कामगार) अक्षी बराबर साह्यब! ह्येच विचार खरा!—

[ गर्दींत पुन्हा गडबड झालेली दिसते झटकन् पुढें येऊन शिवराम पवार जावजी मास्तराच्या शेजारी उभा रहातो ]

**माने :** जरूर तेवढी पड घ्या, आणि मग फेडरेशन तुमच्या पाठीशीं उभं आहे हें ध्यानांत ठेवा. असाच हट्ट धरून राह्यलांत तर मग आमचे उपायच हरले! मग मात्र या संपाशीं फेडरेशन आपला सारा संबंध तोडून टाकील. उगाच एक शब्दहि मी बोलत नाहीं, हें तुम्हाला माहीतच आहे. मला वाटतं तुम्ही विचारी माणसं आहांत. तुम्हाला कुणी कांहींहि जरी सांगितलं (मान्याचे डोळे जगदेव जाधवावर लागले आहेत) तरी तुम्हाला मी निक्षून सांगतो कीं, फेडरेशनच ऐका आणि मग तुमच्या मागण्या आम्ही मिळवून देतों की नाहीं ते पाहा! बोला, काय करणार? सर्वांनी मिळून या लढ्याचा शेवट आपल्या विजयांत करणार, कीं सांप्रतच्या भुकेकंगाल अवस्थेंतच तडफडत मरणार?

[ गर्दींत बराच वेळ कुजबुज सुरू होते. ]

**यल्लाप्पा :** (तोंड वाकडें करून) म्हाइत नाय अजून सायबाला—आमचं कसं हाल होतात ते !

**माने :** (आवाज चढवून) माहीत नाही ? (ओठ थरथरतात.) शहाण्या गृहस्था, मीसुद्धा या साऱ्या हाल अपेष्टातून गेलो आहे बर! मीसुद्धा अगदीं दारिद्र्यातून या स्थितीला पोहोचलोय्. मजुराची दुःखं काय आहेत तीं मला कळताहेत म्हणूनच मीं तुमच्या सेवेला वाहून घेतलय्, समजलात? हालाच्या गोष्टी तुम्ही मला काय सागता? पण सर्वांच्या हिताकरिता थोड्यानीं पड खाल्ली पाहिजे. तडजोडीला कबूल व्हा. फेडरेशन तुमच्या पाठीशी आहेच.

[लोकसमुदायावर नजर रोखून माने स्तब्ध राहतात. क्षणोक्षणी कुजबुज वाढू लागते. पाचसहा-पांचसहा जण एकत्र जमून कामगार आपसात बोलू लागतात ]

**लखू :** मानेसाब अक्षी खर बोलत्यात !

**सावळे :** (शातपणें) हं—दोन महिन्यापूर्वी मी हेच सागत होतो !

[ कालव्याच्या काठीं उभे राहिलेले गांवकरी सभेकडे हसत पाहतात ]

**लखू :** झाल काय ह्यास्नी हसाया ?

**साटम :** (गुरगुरत) पुरे म्हणाव हासू तुमच. नाहीं तर इकडच थोबाड तिकडे करून ठेवीन.

**यल्लाप्पा :** (एकदम मान्याकडे पाहात) भट्टीखात्यात पगार काय देत्यात म्हाईत हाय तुम्हास? पुरा हाय का तो ?

**माने :** मी कधीच म्हणालों नाहीं कीं भट्टीखात्यातले पगार भरपूर आहेत म्हणून. माझ म्हणण हेंच कीं दुसऱ्या कारखान्यातसुद्धा भट्टीखात्यातले पगार एवढेच आहेत.

**साखळकर :** अजीबात खोट! (गडबड होते.) डागाशेटच्या कारखान्यात भट्टीखात्याचे पगार काय आहेत हो ?

**माने :** (जरा नाक मुरडून) मला खोटं बोलायच नाही, पण डागानगरच्या भट्टीखात्यात काम किती आहे, माहीत आहे आपणाला? त्या मानान पगाराच प्रमाण हेच पडत !

**राजा पवार** ( शिवराम पवाराचा धाकटा भाऊ ) : रात्रीच्या कामाची डबल सवाई मिळवून द्यायला तयार आहा तुम्ही ?

**माने** : खात्रीनें !

**यल्लाप्पा** : संपासाठी काढलेल्या वर्गणीच काय झाल, साहब ?

**माने** : (भुवया वर चढवून) एकदा मीं सागितल आहे त्या पैशाच काय करणार ते.

**साखळकर** : करणार ! कधी करणार ? आमच्या सोबत्यापैकीं एकाएकानं हळू हळू फुटून जाव अशी तुमची इच्छा दिसते !

[ गडबड होते ]

**साटम** : (ओरडून) बस करा ही गडबड.

[ साखळकर रागानें माग पाहतो ]

**माने** : ज्याला म्हणून थोडासा मेंदू शिल्लक आहे त्याला माहीत आहे कीं, फेडरेशन म्हणजे काहीं चोराची टोळी नव्हे, कीं लुटारूंचा अड्डा नव्हे. मी माझ म्हणण तुमच्यापुढ स्पष्ट ठेवल आहे. मित्र हो, अंतःकरणपूर्वक विचार करा—तुमच्या सेवेला मी तयारच आहे.

[ माने खालीं उडी मारतात. लोक त्यांना जायला वाट करून देतात कालव्याच्या कांठचा एक गावकरी मान्यांकडे पाहात हसतो आहे. कामगार लोक चारपाच चारपाच एकत्र जमून बोलत उभे राहतात. बाजूला उभ्या असलेल्या जगदेव जाधवाकडे मधून मधून ते पाहतात. ]

**साखळकर** : तुम्हाला फोडण्याचा उपदेश आहे मान्याचा. आमच्याशी दगलबाजी करायला शिकवतो आहे तो तुम्हाला. संपातून फुटून पोट भरण्यापेक्षा डोक आपटून प्राण देईन मी !

**साटम** : कोण बोलतोय् तो फुटण्याच्या गोष्टी ? जरा जीभ आवरून बोला महाराज ?

**विठ्या लोहार** (पोरगाच पण दणकट आहे) : बायकापोराची काय हवाल ?

**साखळकर** : आमच जे होणार तेच त्याच ?

**विठ्या लोहार** : तुझ्यासारख्या लग्न न झालेल्या फटिंगाची गोष्ट निराळी !

**साखळकर** : हवी आहेत कोणाला लग्नं ?

**जावजीमास्तर** : (आवाज चढवून) पोरानों, मी सागतो तेवढं ऐका— लढलो खूप आपून. आता शेटलोकाशी तडजोड कराया हुकूम द्या आमाला. मग बघून घेतो काय ते आमी.

**लखू** : वर जाऊन बोला कीं, मास्तर !

[ जावजीमास्तराच्या नावाची ओरड होते. म्हाताऱ्याला लोक पुढें ढकलतात. मास्तर वर चढतात, आणि गडबड शात व्हायची वाट पाहात उभे राहतात. गडबड एकदम शांत होते ]

**जावजीमास्तर** : आपन लढायचे तितके लढलो, पन आता नाविलाज झालाय्. आपल आता दैवच्च फिरलय्—

**राजा पवार** : नाही नाहीं, हे हरामखोर फेडरेशनवाले—

**जावजीमास्तर** : बाबानु, मुबयवाले बी नाय, आनि फेडरेशनवाले बी नाय काय करीत. आता आपल नशीबच्च फिरल हाय. आनि बर्मलिखिताफुढं कोनाच्च काय बी नाय चालनार. त्येच्या फेऱ्यात पडला की मानूस मेलाच्च ! काळ्याचे केस पाढरे झाले, बाबानु, आनि म्हाताऱ्याचा हा आपला अनुभव हाय. इचार करा. एकदा भगवान कोपला मग धडपड करू नये आपुन ! इनाकारन बायकापोरास ह्या हालात किती रोज ठेवणार आपुन ? ह्ये पुर झाल ?

[ लोक हसतात मास्तर रागावल्यासारखे दिसतात. ]

दात नका काढू. बजावून सागतो, माझा म्हाताऱ्याचा शब्द खरा होयल बघा. मी दगाबाजी नाय शिकवीत कीं फुटायला नाय सागत. ह्यो लढा सुरू करताना मी तर फुडे व्हतो. पण परमेश्वर आपनावर कोपलेला दिसतो आता. एकदा देव कोपला मग धडपड नाय करू माणसानी !

[ जगदेव जाधव मोठ्यानें हसतो. लोक कुजबुजतात. ]

देवावर आपुन विश्वास टाकला पाहिजे. आपुन कधीं कोणाची चोरी करू नये, कीं कोनाला शिवी देऊ नये. आपला परयत्न झाला कीं राह्यलेल काम देवाच्च. साधुसंतांनीं ह्येच्च सागितल हाय. (जाधवाकडे रागानें पाहात) इकड बघा, जाधवराव, देव कोपल्यावर इनाकारन लोकास चिथावन्यांत काय मतलब नाय !

**यल्लाप्पा** : फेडरेशनच काय करावं ?

**जावजी** : फेडरेशनवरचा माझा विश्वास उडाला पार ! भट्टीखात्यात आज ईस वर्स काम करतोय् मी, आनि भटीखात्यात पगार काय हवा ते हे फेडरेशनवाले शिकवतायूत आमाला ! मह्यन्यामह्यन्याला वर्गणी घ्यायला तयार, आनि यानीं केलय् काय आमच्यासाठीं ? ही ठकबाजी नाय तर काय ? मोठ्या गोष्टी सागतो भट्टीखात्याच्या माने ? (कुजबुज सुरू होते.)

**साखळकर** : शाबास जावजीमास्तर !

**जावजी** : ह्यंचा आमा लोकावर विश्वासच नाय. आमी कसा टाकनार त्याच्यावर इश्वास ?

**यल्लाप्पा** : बराबर.

**जावजी** : आता आपल काम आपनच बघून घेऊ !

[ कुजबुज सुरू होते ]

**विठ्या लोहार** : त्येच तर चाललय् !

**जावजी** : इतके दिवस आपन इमानान लढा चालवला आनि आता आपली बायकापोर उपाशी रडू लागली तर आपून हरलो अस कोन म्हनल ? म्हनून सागतो बाबानु, शेट लोकाशीं तडजोड करायला हुकूम द्या आमा पुढाऱ्याना. आपन पडलो तर पडलो, पन बाहेरच्या लोकाची लुडबुड नको मधीं मधीं. हरलों तर आपुन, जिकलो तर आपुन. हें फेडरेशन बिडरेशन नाय पायजे मधी ! निकल जाव फेडरेशनवाले !

[ लोक हसतात. ]

**यल्लाप्पा** : बराबर, निकल जाव फेडरेशनवाले !

[ राजा पवार आणि बरेचसे कामगार ' फेडरेशन फेंक दो, ' म्हणून ओरडतात. ]

**साखळकर** : दगलबाज, हरामखोर !

[ साटम आणि विठ्या लोहार साखळकरास मार देऊ म्हणून धमकावतात. ]

**लखू** : म्हातारचळ लागलाय् जावजीला ! म्हने फेडरेशन नको ! ह्या म्हाताऱ्याला काय अक्कल हाये मान्यापेक्षा ?

**साटम** : हे भट्टीखात्यातले लोक एकापेक्षा एक हरामखोर आहेत !

**सावळे** : तरी मी पहिल्यापासून सागतोय्—

**जावजी** : माझं म्हनन एवढच की देवाला भिऊन आता वागावं.

**यल्लाप्पा** : आणि म्हणूनच चाललेला लढा सोडून न्हाई अर्ध्यावरच ! देव हेच सागतो बर का, मास्तर !

**जावजी** : (तिरस्कारानें) मला हायत कान देव काय म्हनतो ते ऐकायला !

**एक वात्रट पोऱ्या** : लई लाब हायत कान !

[ लोक हसतात. ]

**जावजी** : (त्या पोऱ्याकडे पाहात) अशी देवाधर्माची मस्करी करून चागलं नाय होयाच. देवाला भिवून काय नाय करायच तर आपुन काय तुमच्या बरोबर राहू नाय शकत.

[ जावजीमास्तर खाली बसतात यल्लाप्पा वर चढायला जातो 'ओढा त्याला खाली ! '—म्हणून लोक ओरडतात ]

**यल्लापा** : वढा तेला खाली काय? वा रे, मर्दानो ! (वर चढून जातो.) मला काय जास्त सागायच नाय. पन आता इक्ता डोगर चढूनशान आल्यावर कळस गाठल्याबिगर खाली उतरायचा काय? आपुन सगळे खाद्याला खादा लावून लढलो—आता एकमेकाना ढकलून देयाचा काय? तुमच्यासाठीं आमी भट्टीखात्यातले लोक भाईर आलो नि आता तुमीच आत घुसायला बघता? अर, काय लाज शरम हाय का नाय? हा जावजीमास्तर मोठ्या देवाच्या नि धर्माच्या गोष्टी सागतोय्, पण सोबत्याशीं दगाबाजी हा कुटला धर्म ! माने गयावया करतोय् नि शेट लोक मुबईहून मुद्दाम आलेत म्हणून बावचळून जाऊ नका—दगाबाजी ती दगाबाजी ! आता दगाबाजी कराल पन सुखान झोप नाय यायची जलमभर !—मानगुटीवर भूत बसल कायमच बघा !

[ तो खाली उतरतो त्याच भाषण चालू असता कामगारात कुजबूज चालू असते. शिवराम पवार उडी मारून व्यासपीठावर जातो. त्याचा चेहरा अधिकच त्रासिक दिसतो. लोक त्याच्यावर चिडलेले दिसतात. ]

**शिवराम** : (एकदम बेफामपणें) अगदीं राहवत नाहीं म्हणून बोलतोंय् मी, गड्यानो—आपल्याला तें बोलण्याच काय जमत नाय. आपण माणसं आहोंत

नि माणसासारखे आपण वागलो तर त्यात चूक कांहींच नाहीं. यापुढं संप ओढून धरला तर म्हाताऱ्या-कोताऱ्याचे, बायकापोराचे मुडदे गाडावे लागतील आपल्याला—

**जाधव** : शिवा !—

**शिवराम** : (त्याच्याकडे जळत्या डोळ्यांनीं रोखून पाहात) मानेसाहेबाचं म्हणण पटल आपल्याला—आपलं मन बदललं.

**साखळकर** : अरे सरड्या ! रग पालटलास काय ?

**लखू** : काय रे शिवराम पवार ? असा कसा एकदम उलटलास ?

**शिवराम** : (भावनेच्या आवेगांत) मानेसाहेब बरोबर बोलला—तुम्हीं फेडरेशनच ऐका. फेडरेशन तुमचं कल्याण करील. आपली आतापर्यंत चूक होत होती ती हीच ! अरे, असं सर्व जगाला ठोकरून कसं चालेल ? (जाधवाकडे पाहात) आपण शहाणे—बाकी कुणाला काही समजत नाहीं–फेडरेशनवालेहि आपले शत्रू ! छे, असं चालणार नाहीं ! (जाधवाकडे बोट दाखवून) हा माणूस माथेफिरू आहे. 'या भाडवलवाल्या डाकूंच्या मुंड्या आपल्या हातात आहेत—त्या पुऱ्या मुरगळल्याशिवाय सोडता कामा नये त्याना' ही याची भाषा ! पण आज दिसतंय् काय ? कामगाराच्या बायकापोराचे प्राण कंठाशीं आलेत. मी बोलतोय् ते खर आहे कीं नाहीं याचा विचार करा, गड्यानो. (जाधवाकडे मूठ वळवून पाहतो. पण त्याच्याकडे पाहिल्या-वर जोर कमी झाल्यासारखा होऊन बोलतो.) हा माथेफिरू माणूस तुमचीं डोकीं भडकावील, पण त्याच ऐकूं नका. (लोक 'हूं' करतात.) या माण-साच्या जिभेत आग आहे. (जाधव हसतो.) मानेसाहेबाचं म्हणणं बरोबर आहे. फेडरेशनच्या पाठिंब्याशिवाय आपण म्हणजे कोण्या झाडाचा पाला ! मी काहीं बोलणारा नाहीं. पण खर ते सागतों, गड्यानो—बस्स झाला हा सप. बायकापोराचे सुकून मुडदे पडायची वेळ आलीय्.

[ काहीं लोक पवाराच्या विरुद्ध ओरड करतात, पण त्यांच्या आवाजापेक्षां त्याच्या बाजूच्या लोकांचा आवाज मोठा होतो. ]

**साखळकर** : काय रे शिवा, तूं रे असा एकदम संपफोड्या कसा झालास ?

**शिवराम** : (सतापून) तुमच्या-आमच्यापेक्षा मान्याला जास्त कळतं—संप-

समितीला शेटलोकाशीं तडजोड करायची परवानगी द्या गड्यानो, नि मग बघा सगळं बरोबर होतय्.

[ गळ्याकडल बटन नीट करीत झटक्यात खालीं उतरतो लोकात गलका सुरू होतो—'फेडरेशन बरोबर आहे', 'मानेसाहेबाना पाठिवा द्या!' वगैरे आवाजांचा जोर दिसतो. जाधव शातपणें व्यासपीठावर चढून जातो. एक क्षणभर शातता ]

**विठ्या लोहार :** बस कर, जाधव. आम्हाला तुझ काही ऐकायच नाहीं.

**राजा पवार :** खाली उतर, जाधव!

[ व्यासपीठाकडे गर्दी होते ]

**साखळकर :** (ओठ चावीत) जाधव बोललाच पाहिजे. बोल, जाधव—

**साटम :** (अर्धवट स्वतःशीं) त्याचं डोकंच फोडल पाहिजे—त्याशिवाय तो गप्प नाहीं व्हायचा!

[ जाधवाची नजर सर्वांवरून फिरते लोक हळू हळू शांत होऊन त्याच्याकडे पाहतात. तो बोलू लागतो ]

**जाधव :** माझं काहीं ऐकायच नाहीं तुम्हाला? असं? शिवराम पवाराचं ऐकून घेतलत. जावजीमास्तराच ऐकलत—माझंच ऐकायच नाहीं, होय ना? तुम्हाला दगा देणाऱ्या फेडरेशनच्या मान्याच ऐकलत—मुंबईहून शेट लोक आलेत त्याच जाऊन ऐका. ('हू' असा गर्दीतून आवाज येतो.) हू का? दगा देणारे तुमचे मित्र—मग तुमच्या माना मुरगळणारे शेटलोक तुमचे दोस्तच नाहींत का? (गर्दीतून वाट काढीत साटम व्यासपीठाकडे येतो आहे.) तुला माझ डोक फोडायचय् नाहीं का, साटम? शेटलोकाच्या आधीं माझं डोक फोडण्यात तुला मजा वाटत असेल तर जरूर फोड. पण मला आधीं चार शब्द सागूं द्या—मग उरकून घे तुझं काम! (साटम जागच्या जागीं चरफडत उभा राहतो.) मी तुमचा शत्रू काय रे? भेकड, दगाबाज, संपफोड्या असतो तर कान लाब करून माझ म्हणण ऐकलं असतं तुम्हीं, नाहीं रे? (सर्व स्तब्ध आहेत.) या संपामुळें जास्तींत जास्त नुकसान कुणाच झालय्? माझा स्वतःचा पगार वाढणार होता, पण भट्टीखात्यासाठीं नि तुमच्या सर्वांच्यासाठीं सगळ्याच्या आधीं मी बाहेर आलों—बक्षिसाचे हजार रुपये संपफडाला मीं दिले. जावजीमास्तर

देवधर्मांचा बकवा करतात नि तुम्ही तोडं उघडीं टाकून ऐकता! म्हणे आपण काय करायचे ते प्रयत्न केले—आता दैवच फिरलं—आता देवच कोपला! ज्याना पोटापुढं काहीं दिसत नाहीं असले लोक या गोष्टी बोलतात. पोटाला चिमटा बसला की लागले सरपटायला कोणीहि पुढ! (त्याचा आवाज चढत जातो.) तें काही नाही—देव नि दैव माणसापुढं काहीं नाही! देवाचा ऊस आम्ही आमच्या मनगटानी मोडतो नि आमच्या हातानीं त्याची साखर करतो. देवाला आम्ही आमच्या मनगटानीं वाकवतों. देव काही देत नाही. आमचे हात पिकवतात तेंच आमच्या तोडात जात. (मूठ वळवून) दैव पुढ आलं कीं त्याच्या नाकावर आपला ठोसा हाणा! जावजीमास्तर सागतो, दैव फिरलं रे फिरलं, आता हातपाय गाळून शेट-लोकासमोर सरपटत जा नि ते टाकतील तो भाकरीचा तुकडा चघळीत बसा!

**यल्लाप्पा :** ते काहीं बी होनार नाय!

**साखळकर :** त्या सरपटणाऱ्याच्या तोडात आम्ही माती घालू!

**जावजी :** मी असं कधींच बोललो नाय—

**जाधव :** बोललास नाय, पण जें बोललास त्याचा अर्थ तोच! तुझा हा बायका-पोरंवाला साथीदार—(शिवराम पवाराकडे बोट दाखवीत) म्हणतो, जाध-वाच्या जिभेत आग आहे. खरोखरच माझ्या जिभेत जर आग असेल तर संप मिटविण्याच्या—सप फोडण्याच्या बकव्याच मी भस्म करून टाकीन! संप मागं घेण्याच्या गोष्टी भाडखाऊ भागूबाईनी बोलाव्या.

[ शिवराम पवार मारामारीच्या आवेशात पुढें येतो ]

**राजा पवार :** त्याचे दात पाडून टाक, दादा!

**जाधव :** सबूर, सबूर शिवा! एकमेकाची डोकीं फोडायची ही वेळ नाहीं. (शिवराम पवार थबकतो.) सप मार्ग घेण्याची ही सारी चिथावणी फेड-रेशनच्या मान्याची आहे. खरी दगाबाजी फेडरेशनची आहे.

**साखळकर :** दगाबाजी फेडरेशनचीच!

**जाधव :** मान्याला वाटत, कामगार थकले—जावजीला वाटतं, कामगाराची ताकत खलास झाली—शिवराम पवाराचा तर धीरच सुटला! खोट, खोट, साफ खोट—माझ ऐका—आपली जीत झालीय्! (लोक जवळ येऊन

उत्सुकतेनें ऐकतात.) खुळयानो, पोटाला जरा चिमटा बसल्याबरोबर असं कळवळायचं काय कारण आहे? ही भाडवलशाहीची राक्षसीण आपल रक्त रात्रदिवस शोषून घेतेय्—आपली एक एक जीत म्हणजे हिची एक एक नाडी आखडतेय्. हिच्या नरडीवर आपण पाय ठेवलाय्—तो माग घ्यायचा? या कैदासणीची तुम्हाला तरी पुरी कल्पना पाहिजे. तुम्हाला रक्त ओकायला लावते आणि आपण माजत जाते. भाकरीचा तुकडा तुमच्या तोडावर टाकायचा नि हव तितक तुमच रक्त शोषून घ्यायच! माझ डोक चालवून मीं यत्रात सुधारणा सुचविली त्याचे मला दिले हजार रुपये. पण कपनीचा नफा वाढला दर वर्षाला लाख रुपयानी! असा या राक्षसणीचा न्याय आहे!—तशी मोठी दयाळू आहे ही बया! दान-धर्म, औषधपाणी बिचाऱ्या कामगारासाठीं सगळ काही करील, पण स्वतःच्या नफ्यातला एक छदाम कमी करून कामगाराच्या मागण्या मान्य करील काय? नाव कशाला? या राक्षसणीच नरड आपल्या पायाखाली आलय्—आता नाहीं पाय माग घ्यायचा! थोडी कळ सोसा—जीत तोडाशीं आलीय्, आज सकाळीं आपल्या शेटलोकाचे चेहरे अगदीं जवळून पाह्यला मिळाले मला. एकूण एक मरून गेलेला चेहरा दिसला मला—खलास झालेत—भेदरून गेलेत! त्या एका म्हाताऱ्या डाकूखेरीज बाकीचे हैराण झालेत—कुठे काडीचा आधार मिळतो का कावरेबावरे होऊन पाहात होते. एवढ माझ ऐका तुम्ही! (क्षणभर थाबतो. सगळे सावध आहेत.) आलात तसे परत जा इथून—आमच्या मागण्यात केसभरहि फरक होणार नाहीं, असं त्या चोराना सागण्याची मला परवानगी द्या. पुढल्या आठवड्यात तुमच्या सगळ्या मागण्या मजूर झाल्याची तार मुंबईहून नाहीं आली तर माझा मुडदा पाडा!

**साखळकर, यल्लाप्पा व इतर थोडे कामगार** : खुशाल जाऊन साग त्यांना, जाधव!

[ कामगारात कुजबूज ]

**जाधव** : आपल्या क्षुद्र पोटासाठीं हा लढा नाहीं चाललेला, गडयानो. पण आपण आज जें करू त्याच्यावर पुढल्या सगळ्या पिढ्याच सुख अवलंबून आहे. ही राक्षसीण आपल रक्त शोषतेच आहे, पण आज आपण डगमगलों

नि तिला अशीच माजूं दिली तर आपल्या पोराबाळाना—आपल्या पोराबाळाच्या पोराबाळाना जगायलाच नको—त्याच्या नशिबीं कुत्र्याच्या मोतीनं मरण येईल—

[ गंभीर स्तब्धता जाधवाचे धगधगते डोळे सर्वांना भाजून काढीत आहेत. ]

**साखळकर व यल्लाप्पा** : जाधव, तूच आमचा पुढारी—तू करशील ते खरं!

[ 'जाधवाचा विजय असो!' 'सपफोडे निकल जाव!' वगैरे घोषणांचा कल्लोळ होतो. इतक्यात गर्दीतून वाट काढीत पुढें येत असलेली गीता दिसते. ती व्यासपीठाकडे जाऊन थाबते लोक सावध होतात. जाधवानें तिला पाहिलेलें नाहीं ]

**जाधव** : जावजीमास्तर दैवाच्या गोष्टी सागतात—जावजीमास्तर माणसाचे प्रयत्न हरल्याच्या गोष्टी सागतात. (मूठ आवळून) देवाच्या नाकावर माणसानीं हा अस्सा टोसा दिला पाहिजे—

**गीता** : (त्याला ऐकू जाईल अशा, पण आतल्या आवाजात) गिरिजाबाईचं जास्त झालय्—जाधव—जाधव—गिरिजाबाईची वाचा गेलीय्! चला—तिकडे चला—(जाधव डोळे विस्फारून तिच्या तोंडाकडे टकमका पाहतो. भाषण पुरे करण्याचा प्रयत्न करतो.)

**जाधव** : मी म्हणतो—मी म्हणत होतो शेटलोकाना आले तसे—

**जावजीमास्तर** : (पुढें होऊन) जाधव, तुला ऐकू येतय् की नाहीं? गिरिजाचं जास्त झालय्—

**जाधव** : काय—काय? (सर्वत्र स्तब्धता)

**जावजी** : गिरिजाच जास्त झालय्. तू एकदम तिकडे जा.

[ जाधव क्षणभर पुढें मागें पाहतो व्यासपीठावरून उडी मारून भराभर निघून जातो. लोक बाजूला सरतात, आणि त्याला गंभीरपणें वाट करून देतात. अंधार झपाट्याने पडतो आहे )

**गीता** : आता कशाला धावत जाताय्त, जाधव? गिरिजाबाईचा केव्हाच प्राण गेलाय्. (सर्वत्र भयानक स्तब्धता पसरते. गीता बेफाम आवेशानें बोलू लागते.) राक्षसानो, आणखी किती बायाबापड्याचीं हाड मसणात पोहोचवण्याचा विचार आहे तुमचा?

[ जागच्या जागीं अस्वस्थ होऊन कामगार मागें सरकू लागतात. हळू हळू गर्दी पांगते घोळक्याघोळक्यानें ते आपसांत खिन्नपणें कुजबुजू लागतात. गीता तरातरा जाऊ लागते. स्तब्धपणे सर्वजण तिच्या जाणाऱ्या आकृतीकडे पाहात राहतात ]

**लखू** : नुसती कडाडबिजली आहे बुवा तुझी पोरगी, जावजी मास्तर !

**साटम** : भारीच तोड टाकते—इकडचं थोबाड तिकड करायला पाहिजे !

**सावळे** : तोड टाकील नाही तर काय करील ? केव्हापासून सागतोय् मी हा सप आता माग घ्या म्हणून !—बिचारी गिरिजा !

**जावजी** : जाधवाला पहिल्यापासून सागतोय् मी, की बाबा, देवाधर्माची उठल्यासुटल्या टायली करू नकोस. दैवाच्या नाकावर म्हणे ठोसा द्या. बाबा, दैवच हा असा ठोसा हाणत बर !—

**साखळकर** : या वेळीं आपण सर्वांनीं जाधवाला उचलून धरलं पाहिजे. (' जाधव ! जाधवाचा विजय असो ! ' वगैरे घोषणा) त्याच्यावर हा प्रसग आला असताना त्याच्याशी बेइमान होणारा कुणी निघेल, अस मला वाटत नाहीं. आपल्यासाठीं त्यान पैसाअडका सर्व घालवलच, पण शेवटीं हा बायकोचा बळी त्यान आपल्यासाठींच दिला !—त्याची बायको तुमच्या-आमच्यासाठीं मेली.

[ कामगार जाधवासबधीं आपसांत उत्साहान कुजबुजू लागतात. ]

**शिवराम पवार** : (व्यासपीठापुढें उभा राहून) तुमच्या-आमच्या बायकाचीं हाड मसणात पोहोचवली की त्याची बायको परत येईल, नाहीं ? स्वतःची बायको मारली—आता तुमच्या-आमच्या बायकापोरांचे मुडदे पडले म्हणजे तो सुटेल, नि तुम्ही-आम्हीहि सुटू !

**लखू** : जाधवाच्या बायकोचा संपान बळी घेतला !—आणखी बळी पडायच्या आत हा संप माग घेतलाच पाहिजे !

**राजा पवार** : बस्स झाला संप !

[ कामगारांचीं मते सप मागें घेण्याकडे वळलेली दिसतात. ]

**शिवराम पवार** : संपान कसला ? स्वतःच्या बायकोचा बळी जाधवान स्वतः घेतला—जाधवाच्याच हटवादीपणामुळें बिचारी गिरिजा बळी पडली. या

माणसाचा नाद तुम्ही आता तरी सोडणार की नाही ?

**राजा पवार,**
**सातम व इतर**
**एकदोन कामगार** } —खूप झाल जाधवाच पुढारीपण !

[ 'बस्स झाला संप !' या घोषणेचा जोर होतो ]

**साखळकर :** त्याच्यावर प्रसंग गुदरला असताना त्याला सोडून पळता, भागूबाईनो ? थूः तुमच्या दानतीवर !

**राजा :** या साखळकराचे दात पाडले पाहिजेत !

[ सातम साखळकराच्या अंगावर धावतो साखळकर हात उगारतो कुणी तरी मध्यें पडतो. ते दोघे एकमेकाकडे पहात उभे रहातात ]

**शिवराम पवार :** (व्यासपीठावर चढून) त्याच्यावर त्यानहून प्रसंग ओढवून घेतला. आमच, फेडरेशनच, कुणा कुणाच म्हणून ऐकायच नाही. मी शहाणा, बाकी सगळे मूर्ख, हा त्याचा बाणा ! सगळ जग खोटं, माझ तेच खर—याची किती म्हणून पत्रास चालू द्यायची ?

**साखळकर :** त्याच्यावर आकाश कोसळलय् आज—

**शिवराम :** उद्या तुमच्या आमच्यावर आकाश कोसळणार आहे—माझ्या म्हातारीन अंथरूण धरलय्—

**सावळे :** तो नि त्याच नशीब !—आता आपल्याला काय करायचं ते करून टाकू.

**राजा :** जाधव खलास ! जाधव खलास !—

**विठ्या लोहार :** जाधव खलास नि संपहि खलास !—

[ 'संप खलास ! संप खलास !' या आरोळ्यापुढं काही ऐकू येत नाहीं. साखळकर आणि यल्लाप्पा थरथरत कामगारांकडे पहाताहेत. सावळे विठ्या लोहाराला कांहीं तरी समजून सांगतो आहे ]

**शिवराम पवार :** (ओरडून) फेडरेशनच्या हातात सर्व कांहीं सोपवून टाकूं या, गड्यानों !

[ कामगार 'हो' म्हणून ओरडतात ]

**साखळकर** : ( दात-ओठ खात ) संपफोडे ! विश्वासघातकी कुतरडे !

**साटम** : (त्याच्या मानेवर हात ठेवून) कोण रे विश्वासघातकी, कुतरीच्या ?

[ साखळकर मानेवरला त्याचा हात उडवून त्याचा गळा धरतो. त्यांची मारामारी जुपते कालव्याच्या कांठचे होडीवाले हसत हसत मजा पहातात. जावजी मास्तर पुढे होऊन बोलतो ]

**जावजी** : अरे, अरे, काय हें!—आपापसातच लढून मरा, लेकानो! तुम्हाला लढायच म्हाईत हाय. कशासाठी लढायच ते कुनालाच म्हाईत नाय !

[ लखू, विठ्या लोहार, 'सावळे वगैरे साखळकर आणि साटम याना दोन बाजूना ओढतात. अंधार गडद होत जातो तसा पडदा खाली येतो ]

# ३

[ सध्याकाळी पाचाचा सुमार आहे देशमुखाचा पहिल्या अकांतलाच दिवाणखाना बोर्डाच्या बैठकीसाठीं आणलेले लांबट टेबल शेजारच्या खोलींत नेल्यामुळ दिवाणखाना अधिक सुव्यवथित वाटतो. दया लहान मुलाचें लोकरीचें झबल विणीत बसली आहे. दिवाकर एक मासिक वाचण्याचा प्रयत्न करतो आहे. ]

**दिवाकर :** (मनगटावरल्या घड्याळाकडे पाहात) पाच वाजले. साडेपाचला माने नि संपसमितीचे लोक शेवटचा काय तो निर्णय घेऊन येणार आहेत. चद्रशेखर कुठ गेलेत? पलिकडच्या हॉलमध्यें सगळे डायरेक्टर त्याची वाट पाहताहेत.

**दया :** पॉवर हाऊसच्या बाजूला जाऊन येतो म्हणाले. तुमच्या मीटिंगचा त्याच्यामुळें खोळबा झालाय् कीं काय?

**दिवाकर :** तसं काहीं नाही. चद्रशेखराना काहीं व्होट नाहीं. पण मॅनेजर म्हणून ते हजर असले म्हणजे बर. महत्त्वाचा निर्णय घ्यायचाय् बोर्डाला. (डाव्या बाजूला खोलीकडे पाहात) बाबा झोपलेत का अजून ?

**दया :** झोपतात कसले? दुपारीं जेवलेसुद्धा नाहीत—पडलेत बिछान्यावर नुसते.

**दिवाकर** : आताच्या या मीटिंगला त्यानीं येऊंच नये असं मला वाटतं. दुसऱ्या कुणाला तरी चेअरमन् करून काय घ्यायचा तो निर्णय बोर्ड घेईल. (दया त्याच्या तोंडाकडे पाहते.) काहीच्या बाहींच झालंय् सगळ काही, दया !

[ हातातल्या मासिकाचीं पानें अस्वस्थपणें चाळतो ]

**दया** : दुपारी मी जाधवाच्या घरी गेले होते—

**दिवाकर** : भलतच धाडस केलस तू.

**दया** : मारून टाकतोय् तो बायकोला, दिवाकर!

**दिवाकर** : त्याच्याइतकीच आमचीहि जबाबदारी आहे तिचे हाल चाललेत त्याबद्दल, होय ना ?

**दया** : (एकदम) झालय् काय जाधवाला तडजोडीला तयार व्हायला ?

**दिवाकर** : कामगाराच्याहि बाजून बोलण्यासारख पुष्कळ आहे, दया.

**दया** : तिथ जाण्यापूर्वी कामगाराबद्दल मला जितकी सहानुभूति वाटत होती तितकी आता मुळींच वाटत नाहीं. आपल्या वर्गातले नाहींत ते सर्व लोक आपले शत्रू वाटतात त्याना. गिरिजेच्या चेहऱ्याकडे बघवेना माझ्यान पांढरीफटक झालीय्—घरात खायला काही नाहीं. कुणी तरी शेजारणीन येऊन पेज उकडून ठेवली होती.

[ दिवाकर उठून येरझाऱ्या घालू लागतो ]

पण इतक्या हालातसुद्धा जाधवाच काहीं चुकलय् म्हणायला तयार नव्हती ती ! खरच, दिवाकर, कामगाराच्या बायकापोराच ते दैन्य उघड्या डोळ्यानीं बघवत नाहीं. पण काय कराव ते सुचत नाही. वाटत विचारच करू नये !

**दिवाकर** : करू नये म्हणून विचार थोडेच राहणार आहेत ?

**दया** : मात्र तिथ जाताना त्याच्या बाजूची मी जितकी होते तितकी येताना खास नव्हतें. पुष्कळ लोक कामगाराच्या दुःखाच्या नि त्याच्या दुःख-निवारणाच्या गोष्टी करतात, पण प्रत्यक्ष तिथ जाऊन काहीं करण किती कठीण आहे याची फारच थोड्याना कल्पना असेल. मला तर तें शक्यच वाटत नाहीं.

**दिवाकर** : हूं !

**दया :** पण आजुबाजूला या अशा हालअपेष्टा, हें कण्हणं-कुंथणं पसरलेलं असताना इथ दिवस काढण कठीण आहे. थोडीशी पड बाबानीं घ्यायला हरकत नाहीं.

**दिवाकर :** सूर्य पश्चिमेला उगवेल, पण बाबा पड घेणं शक्य नाही. तसं काहीं करण म्हणजे त्याना पचमहापातकापैकीं एक वाटत. (खिन्नपणें) काय होणार ते दिसतंच आहे.

**दया :** काय?

**दिवाकर :** त्याना धुडकावून काहीं तरी तडजोड करण्याचा ठराव बोर्ड पास करणार.

**दया :** बाबाना धुडकावणार? नि हे लोक?

**दिवाकर :** तुला कल्पना नाहीं त्याची. काय घाबरगुंडी उडालीय् त्याची! आतापर्यंत झालेल्या नुकसानीनच त्याची छाती दडपून गेलीय्.

**दया :** ते खूप धुडकावतील, पण बाबा काय त्याना धुडकावूं देतात!

**दिवाकर :** बहुमतान एखादा ठराव पास झाल्यावर बाबाच काय पण कुणीच त्याविरुद्ध काहीं करूं शकत नाहीं, दया.

**दया :** म्हणजे? (भीतिग्रस्त स्वरात) म्हणजे अध्यक्षपदाचा राजिनामा देऊन बाबा कपनीच्या बाहेर पडतील?

**दिवाकर :** अर्थात्! आपला पराभव झाल्यावर फायद्याच्या आशेनं जागेला चिकटून राहणाऱ्यापैकीं बाबा नाहीत. त्याना हा तत्त्वाचा प्रश्न वाटतो.

**दया :** पण ही कपनी म्हणजे बाबाचं जीवन, नि ही कंपनी म्हणजे बाबा, अशी स्थिति आहे. बाबासाहेब सुभेदाराशिवाय सुभेदारवाडी ही कल्पनाच करवत नाहीं. आता शहात्तराव्या वर्षीं कपनी सुटली तर ते जगतील कशा-साठीं? (दिवाकर अस्वस्थपणें इकडे तिकडे पाहतो.) दिवाकर—दिवाकर —या वयात तरी बाबावर असा काहीं प्रसंग यायला देऊ नकोस.

**दिवाकर :** (त्यालाहि तितकेच वाईट वाटलें आहे, पण त्या भावना छपवण्याकरिता तो आवाज चढवतो.) खरं सागायचं, दयाताई, म्हणजे या सपात कामगाराचं काहीं एक चुकलेलं नाहीं. माझी सहानुभूति सर्वस्वीं त्याच्या बाजूला आहे.

**दया :** तें कांहीं म्हण तूं, दिवाकर, पण गेलीं तीस वर्षे आपल रक्त आटवून ही कंपनी बाबांनीं नावारूपाला आणली आहे. ही कंपनी म्हणजे बाबा!—इतराना कोण ओळखतो? कपनीवर आलेल्या सर्व संकटातून बाबानीं एकट्यानीं—स्वतःच्या हिमतीन तिला वेळोवेळीं निभावून नेल आहे! काहीं कर तूं, दिवाकर, पण बाबावर असा प्रसग येऊ देऊ नकोस.

**दिवाकर :** मीं काय करावं अस वाटत तुला, दया?—बाबानीं थोडी पड घ्यायला काय हरकत आहे अस मघाशी तू म्हणत होतीस, पण आता काहीं करून बाबाना उचलून धरायला सागतेस. बाबा मुळींच पड घेणार नाहींत, तुला माहीत आहे. कपनीचा कारभार म्हणजे काय पोरखेळ आहे?

**दया :** (चिडून) कपनीचा कारभार पोरखेळ नसेल, पण बाबाच्या जिवाशी खेळ खेळायचा तुम्हाला मुळींच अधिकार नाही. ते पड घ्यायला तयार नाहीत म्हणून तुम्ही—बोर्ड त्याना धुडकावून लावणार? त्याना केवढा धक्का बसेल—त्यातून ते या वयात उठतील्स मला वाटत नाही.

**दिवाकर :** तूच म्हणत होतीस, दया, कामगाराच्या हालअपेष्टा बघवत नाहीत—इथ राहण आता अशक्य आहे—

**दया :** होय, म्हणत होते. पण बाबाच्या जिवापुढें मला कशाचीहि पर्वा वाटत नाही. बाबाना धुडकावून लावण्याचा ठराव होऊ देता कामा नये. बाबाबद्दल भीति वाटते मला. बाबाना इतर सर्व डायरेक्टर्स वचकून आहेत. तूहि बाबाना उचलून धरलस तर त्याची छाती नाहीं—

**दिवाकर :** (कपाळ हातात धरून) पण माझहि मत इतर डायरेक्टरा-सारखच आहे. त्याची कारण वेगळीं असतील—ते नुकसानीला घाबरले असतील. मला मनःपूर्वक कामगाराची बाजू बरोबर वाटते—पण हा सप मिटवून टाकावा असं मला प्रामाणिकपणें वाटत. बाबानी थोडी पड घ्यावी तुलाहि असं वाटत होत. स्वतःच्या अंगाशी आल कीं प्रामाणिक मतावर पाणी सोडण मला बरोबर वाटत नाही, दया.

**दया :** हा मताचा नि स्वतःच्या अंगाशीं येण्याचा प्रश्न नाहीं, दिवाकर!—हा बाबाच्या जिवाचा प्रश्न आहे.

**दिवाकर :** तेच, तेंच, स्वतःचा नाहीं, स्वतःच्या कुटुबाचा! स्वतःसाठीं

नाहीं, तर स्वतःच्या कुटुंबासाठीं टोपी फिरवा !

**दया** : ही थट्टेवारी नेण्यासारखी गोष्ट नाहीं, दिवाकर.

**दिवाकर** : (गंभीरपणें) तुझ्याइतकंच माझं बाबांवर प्रेम आहे, दया. तरी पण ही गोष्ट अगदी वेगळी आहे.

**दया** : कामगारांच्या हालअपेष्टा भयंकर आहेत, हें सर्व खरं आहे दिवाकर, पण आणखी एकदोन दिवसांनीं त्याचं काहीं विशेष भयंकर होणार आहे, असं नाहीं. पण बाबांना ब्लडप्रेशर किती आहे हें डॉ. बेदरकरांनीं सांगितलेलं तुला माहीतच आहे. त्याची किती काळजी घेतली पाहिजे याची कल्पना आहे तुला. असा काहीं धक्का त्यांच्या मनाला बसला तर एकदम झटकाच यायचा. बाबांपेक्षा तुला कामगार अधिक वाटतात ?

**दिवाकर** : तुला माहीत आहे मला काय वाटतं तें, दया.

**दया** : मग असं काय करतोस तर ?

**दिवाकर** : कसं सांगायचं तुला ?

**दया** : त्यांत सांगण्यासारखं काही आहे का ?

**दिवाकर** : पुष्कळ आहे.

**दया** : बाबांच्या जिवाचा विचार आधीं, मग बाकी सर्व—

**दिवाकर** : काय आधी, काय मग तें ठरवणं कठीण आहे.

**दया** : (काकुळतीला येऊन) असं काही होऊं देतां कामा नये तूं, दिवाकर.

**दिवाकर** : हूं.

**दया** : हूं नाही, वचन दे !

**दिवाकर** : माझ्याकडून शक्य आहे तें मी सर्व करीन गं, दया.

**दया** : (बाजूच्या खोलीच्या दारावरला पडदा बाजूला सारून बाबासाहेब येतात. दिवाकर उठून पलीकडे डायरेक्टर्स बसलेत त्या हॉलमध्यें जातो. त्या हॉलमधून वाठारकर, धुमाळ, वगैरेंचे मोठमोठ्यानें बोलत असल्याचे आवाज ऐकूं येतात. 'पाच तर वाजून गेलेच ! साडेसातची गाडी मिळणं शक्य नाही !' वाठारकर बोलत आहेत.)

**बाबासाहेब** : तूं जाधवाच्या घरीं जाऊन आलीस म्हणे ?

**दया** : होय, बाबा.

**बाबासाहेब** : गाठीभेटी घेऊन सोन्याची माती नि मातीच सोन बनवतां येत नाहीं, दया !

**दया** : (हातातलें विणकाम बाजूला ठेवीत) असं काय बोलता, बाबा ?

**बाबासाहेब** : बोलायच तेंच बोलतोंय्. आजच्या काळातला हा देव-दैत्याचा लढा आहे. बायाबापड्याच्या गाठीभेटींनीं सुटण्यासारख तें साध भाडण नाहीं. (ते हॉलच्या दरवाज्याकडे जाऊ लागतात.)

**दया** : मला तें काहीं कळत नाहीं. तुमच्यासंबधीं मला भीति वाटते, बाबा.

**बाबासाहेब** : माझी काळजी करू नकोस, पोरी.

**दया** : तुम्हाला त्यांनीं (हॉलकडे बोट दाखवते.) धुडकावून लावल तर काय होईल याची भीति वाटते मला.

**बाबासाहेब** : मला कोण धुडकावून लावणार ?

**दया** : तुम्ही जाऊच नका या सभेला, बाबा—त्याच त्यानाच काय तें ठरवून घेऊं द्या—

**बाबा** : म्हणजे लढाईला तोंड लागणार तेव्हाच मी पळ काढू, होय ?

**दया** : तसं नाहीं, बाबा—सर्व डायरेक्टर्स तुमच्या विरुद्ध जातील असं मला वाटतं.

**बाबासाहेब** : पाहू या. (हॉलचा दरवाजा लोटून आत पाऊल टाकतात.)

**दया** : बाबा, माझ एवढं ऐकाच—आज नकोच (निश्चयपूर्वक ‘नाहीं’ म्हणून मान हलवून ते आत जातात. दरवाजा उघडताच आतून डायरे-क्टराचे आवाज ऐकू येतात.)

**वाठारकर** : अगदीं वेळेवर येते का ती साडेसातची गाडी, कुळकर्णी ?

**कुळकर्णी** : बहुधा येते, साहेब.

**धुमाळ** : झाला तेवढा भलेपणा खूप झाला. आतां सोक्षमोक्षच मी लावणार !

**दिवाकर** : काय ?

[ बाबासाहेब आंत गेल्यावर एकदम स्तब्धता होते. ]

**दया :** (विणकाम घेऊन इकडे तिकडे फिरते. काहीं क्षण गेल्यावर 'बाबाजी, बाबाजी' म्हणून हाक मारते. बाबाजी येतो.)

**बाबाजी :** काय, ताईसाहेब?

**दया :** आणखी थोडया वेळानें संपसमितीचे लोक इथं येतील.

**बाबाजी :** त्याना व्हराडयात बसवून ठेवतों.

**दया :** नको—नको. तेवढ्यानेंच त्याना अपमान झाल्यासारखं वाटायच —इथच बसू द्या त्याना.

**बाबाजी :** ठीक आहे. (जायला वळतो. पुन्हा माग वळून) मोठे साहेब दुपारीं जेवले नाहींत, ताईसाहेब.

**दया :** हूं.

**बाबाजी :** सकाळपासून कॉफीशिवाय काहीं घेतल नाहीं त्यानीं.

**दया :** ते सागतात—तूं देतोस कॉफी करून!

**बाबाजी :** मोठ्या साहेबाना अमक करा, तमक करू नका सागण्याची कुणाची छाती आहे काय? त्याच्या बऱ्याच कुणीं सागितल तरी ते ऐकायचे नाहींत. आता म्हातारपणीं तर फारच हट्टी झालेत.

**दया :** त्याला काहीं इलाज आहे का, बाबाजी आतां?

**बाबाजी :** आहे! (शातपणें) त्याच्या बऱ्यासाठींच बोलतोय् मी हे, ताई-साहेब. त्याच्यावर माझी किती भक्ति आहे हें तुम्हाला माहीत आहेच.

**दया :** तुला म्हणायचय् काय, बाबाजी!

**बाबाजी :** त्याची काळजी आता आपणच घेतली पाहिजे. त्यांचं काहीं चालू देता कामा नये.

**दया :** म्हणजे?

**बाबाजी :** या संपान त्याना जेरीला आणलय्. पण ते कबूल करणार नाहींत. हा संप मिटलाच पाहिजे. मोठ्या साहेबांचं काहींएक न ऐकता (हॉलकडे बोट दाखवून) या लोकानीं हा संप मिटवून टाकावा. म्हातारपणीं माणसाचे कांहीं हट्ट चालू देतां कामा नयेत. आपल्याला काय झेपेल, काय नाहीं तें माणसाला म्हातारपणी कळत नाही. संतापतील, ओरडतील, पण मग त्यांचं

त्यानाच वाईट वाटेल—स्वतःच्या अनुभवावरून सागतों; माझं असंच होतं पुष्कळ वेळा—

**दया :** (हसून) तूं कधीं संतापत असशील, अस मला वाटत नाहीं, बाबाजी!

**बाबाजी :** हं—तसं नाहीं ह, ताईसाहेब. माझ्या मोठ्या मुलाला विचारा.

**दया :** (हॉलच्या दरवाज्याकडे मधून मधून ती अस्वस्थपणें पाहात आहे.) परिस्थिति मोठी चमत्कारिक झालीय्, बाबाजी.

**बाबाजी :** मला त्याची कल्पना आहे, ताईसाहेब. मोठ्या साहेबाना आज उणींपुरीं चाळीस वर्षे पाहतोय् मी. त्याच्यापुढें कुणाची ब्र काढण्याची छाती नाही. त्याच्या मनाविरुद्ध हा संप मिटवून टाकला तर ते भलतच होणार आहे. पण त्याच्या बऱ्यासाठींच या संपाचा आता निकाल लागला पाहिजे. (खालच्या आवाजात) हिरालालशेटना आपली तीं नवी फुलझाडं दाखवताना मी हळूच म्हणालों, मोठ्या साहेबानीं काहीं म्हटल तरी मिटवून टाका हा संप तुम्ही! या सगळ्या साहेबात हिरालालसाहेब मोठे समजूतदार म्हणून आपल बोललो. ते म्हणाले, ते मोठ कठीण काम आहे—तुला माहीत आहे, बाबाजी! पण सगळ्याच्या भल्याकरिता तुम्हाला तें करायला पाहिजे साहेब, मी म्हणालों. मोठ्या साहेबाचा तू जुन्यात जुना विश्वासू नोकर, तूच साग त्याना—हिरालालसाहेब मला म्हणाले. मी म्हटल, बर—

**दया :** मग?

**बाबाजी :** साहेब एकटे होते तेव्हां बोललों मी. एकदम उसळून म्हणाले, भलत्याच भानगडींत पडायच असेल तर नोकरी सोडून चालायला लाग तू, बाबाजी! मी आपला गप्प राहिलों.

**दया :** (हॉलच्या दाराकडे जाऊन आंतली बोलणीं ऐकण्याचा प्रयत्न करते. काहीं विशेष ऐकूं येत नाहीं. अस्वस्थपणें) बाबाजी, जाधवाला तू चागला ओळखत असशील?

**बाबाजी :** तसं बोलणचालणं नाहीं, पण ओळखतों चागला.

**दया :** तुझं काय मत आहे त्या माणसाविषयीं?

**बाबाजी :** तो माणूस म्हणजे भडकलेली आग आहे, ताईसाहेब. नको तें खाक करील, नाहीं तर स्वतः खाक होऊन जाईल! कामगाराच्या

हितासाठीं मालकाशीं लढण्यापेक्षा मालकाना नाहींसं करायला बाहेर पडलेला माणूस आहे तो. त्याला चागला मालक नि वाईट मालक माहीत नाहीं. मालक म्हटला कीं तो वाईटच. मालक म्हटला कीं त्याच पित्त खवळतं.

**दया** : बाबाहि हीच भाषा बोलतात. त्यांचहि जाधव म्हटला कीं पित्त खवळत.

**बाबाजी** : तें माझ्या लक्षात आलंय्, ताईसाहेब. (ती त्याच्याकडे रोखून पाहते, पण तो मनापासून वाटतं ते बोलतो आहे हें पाहून हॉलच्या दरवाज्याकडे मधून मधून अस्वस्थपणें पाहात त्याचं बोलण ऐकते.) दोन आगींचीच ही लढत आहे. हा जाधव इतक्या कसल्या अभिमानान पेटलाय् ते मला समजत नाहीं. चार कामगारासारखाच हाहि एक कामगार आहे. यंत्राची चागली माहिती आहे त्याला. काहीं सुधारणा सुचविली म्हणून बक्षीसहि मिळाल त्याला म्हणे. पण त्यात काहीं मोठंसं आहे असं मला वाटत नाहीं. मुबईच्या गिरणींत माझा भाऊ आहे, त्यानहि दोन साचे एकाच कामगारान चालवण्याची युक्ति शोधून काढली होती. त्याला त्याच काहीं मिळाल नाही. किती तरी गिरण्यात ती युक्ति वापरतात. (दया हॉलच्या दरवाजाजवळ जाते.) काहीं माणसं मुळीं जन्माला येतात तींच जगाला शिव्या देत! आपण मालक म्हणून जन्माला न आल्याबद्दलच त्याचा जगावर राग! आपल्याला हें पसंत नाहीं—देवानं आपल्याला कामगार केल म्हणून मालकाना पाण्यात पाहण्यात अर्थ नाहीं. तसंच मालकानीं पण कामगाराना कमी लेखण्यात अर्थ नाही. देवान आपल्याला केल तें केल—कुणी कमी नाहीं कीं कुणी जास्ती नाहीं!

**दया** : (त्याच्या चऱ्हाटाला कटाळून) हू—हू—! बाबाजी, त्याना हॉल-मध्यें काही चहा-कॉफी पाहिजे का विचारून ये. मीं पाठवलय् म्हणून साग.

**बाबाजी** : बर! (तो हळूच दरवाजा उघडून आत जातो. आतल्या बोलण्याचे आवाज बाहेर ऐकू येतात.)

**धुमाळ** : मला तुमचं म्हणण मुळींच मान्य नाही.

**हिरालाल** : हें मी पचविसाव्या वेळीं ऐकतोयू. नवीन काहीं तरी सागा.

**दिवाकर** : (अधीरपणें) बर मग, ठराव तरी काय आहे?

**वाठारकर** : चेअरमन्‌साहेब काय म्हणाले तें मला नीटसं ऐकूं आलं नाहीं. काय? चहा? आपल्याला नको बुवा चहा? आधींच घामाच्या धारा लागल्यात!

**हिरालाल** : चेअरमन्‌साहेबाचं म्हणण असं दिसतंय्—

[ बाबाजी बाहेर येतो. आणि दरवाजा लावतो. कांहींच आवाज ऐकू येत नाहींत. ]

**दया** : काहींच नको त्याना, बाबाजी?

**बाबाजी** : नको म्हणतात.

[ दया अस्वस्थपणें हॉलच्या दरवाज्याकडून टेबलाकडे येते टेबलावर अर्धवट विणून पडलेल्या झबल्याकडे पाहते. इतक्यात मोलकरीण प्रवेश करते ]

**मोलकरीण** : कुणी तरी गीता पवार नावाची बाई तुमची चौकशी करतेय्, बाईसाहेब.

**दया** : पवार?—गीता?

**मोलकरीण** : होय, बाई—

**दया** : हं-ह-कुठ आहे ती?

**मोलकरीण** : बागेच्या फाटकाशीं.

**दया** : तिला म्हणाव मला नाहीं तिला—

**मोलकरीण** : घरात नाहींत बाईसाहेब म्हणून सागूं?

**दया** : अं? नको—मी येतें बाहेर—नाहीं तर बोलाव तिला इथेच.

[ मोलकरीण आणि बाबाजी बाहेर जातात कांहीं तरी निश्चय केल्यासारखा चेहरा करून दया विणकाम हातांत घेऊन बसते. मोलकरीण गीता पवारला दारांत आणून सोडते. गीता दारांतच उभी राहते ]

**दया** : ये—आत ये—काय पाहिजे तुला?

**गीता** : गिरिजाबाईचा तुम्हाला एक निरोप आहे.

**दया** : निरोप?

**गीता** : होय, निरोप. आपल्या म्हाताऱ्या आईला कुणी नाहीं, तिच्यावर लक्ष ठेवा, असं तुम्हाला सागायला सागितलंय गिरिजेनं.

**दया :** मला या निरोपाचा कांहीं अर्थच कळत नाहीं.

**गीता :** (तिरसटपणें) निरोप सागायचं काम मला सांगितलं तें मीं केल.

**दया :** पण तिच्या आईची काळजी मी—मला काहीं समजत नाहीं.

**गीता :** गिरिजाबाई वारल्या. मरतां मरता मला निरोप सागितला तो मीं तुम्हांला सांगितला.

[ कांहीं क्षण स्तब्धता ]

**दया :** (शहारून) दोन ताससुद्धा झाले नसतील मी· तिला भेटून—गिरिजा वारली ?

**गीता :** हो, वारली !—अन्नपाण्याशिवाय, औषधपाण्याशिवाय तडफडून मेली !

**दया :** खोट ! तिला काळजाचा रोग झाला होता. माझ्याकडे अशी डोळे फाडून काय पाहतेस ? गिरिजेला वाचवण्याचा मी खूप प्रयत्न केला.

**गीता :** (मनातली धुमसती आग आवरण्याचा खूप प्रयत्न करीत) तरी पण तिच्या मरणाच खर कारण अन्नपाण्याशिवाय हाल हाल हेंच

**दया :** (आवेशानें) तुम्हा लोकासाठीं मनापासून काही तरी करण्याचा मी प्रयत्न करतें, पण त्याच तुम्हाला काहीं—काही नाहीं.

**गीता :** आमच कुणीं वाईट केल नाहीं तर आम्ही उगाच नाही कुणाच्या वाटेला जात.

**दया :** मी काय तुमच वाईट केलय ? मला कशाला सागतेस हें ?

**गीता :** (कटुतापूर्ण स्वरात, थरथरत) खाऊन पिऊन भरल्या पोटावर आमच्या कामगार वस्तींत बातम्या काढायला येता काय तुम्ही ? खरोखर मदत करायची इच्छा असते तुम्हाला ? आठ आठ दिवस चणे कुरमुरे खाऊन काढा म्हणजे भुकेनं तडफडण म्हणजे काय ते कळेल तुम्हाला !—तुम्हा लोकाना आठ आठ दिवस अन्न मिळता कामा नये.

**दया :** तुझ डोक फिरलय्

**गीता :** गिरिजाबाईचे प्राण जाताना मी तिच्या जवळ होतें. चेहरा पाढराफटक पडला होता—तिचा हात माझ्या हातात होता—नखात रक्ताचा टिपूस नव्हता !—

**दया** : (दुःखपूर्ण स्वरात) माझं ऐकल असत तर ती वाचली असती. तिच्या अन्नपाण्याची—तिच्या औषधपाण्याची सर्व व्यवस्था करायला मी तयार होतें. पण ती ऐकूनच घेईना. भलताच अभिमान काय उपयोगाचा?

**गीता** : गरिबाजवळ तेवढ तरी भाडवल राहू द्या!

**दया** : (आवेगानें) तुझ्याशीं बोलण्यात काही अर्थ नाहीं. गिरिजेबद्दलच्या माझ्या भावना तुला कळण शक्य नाहीं! तुम्ही गरिबीत जन्मलात आणि मी श्रीमंतींत जन्मलें हा काय माझा दोष?

**गीता** : तुमची श्रीमती तुम्हालाच लखलाभ होवो!

**दया** : तुमच्या दृष्टीन इतराना काहीं बाजूच नाहीं—तुमच सर्व बरोबर, इतराच सर्व चूक! जा, जा—मला वीट आलाय् या बोलण्याचा.

**गीता** : (खिन्न स्वरात) तुमच्या भलेपणाचा, तुमच्या परोपकाराचा, तुमच्या गोड गोड शब्दाचा काहीं उपयोग नाहीं. तुम्हीं—तुम्हीं—तुम्ही नि तुमच्या वडिलानीं गिरिजेचा खून केला!

**दया** : (संतापानें) खोट, खोट, साफ खोट! तुमच्या या भयकर संपान बाबाची दशा दशा झालीय्.

**गीता** : अस्स? मग गिरिजाबाईच्या मरणाची बातमी त्याना सागा—त्याना जरा बर वाटेल!

**दया** : चालती हो इथून!

**गीता** : आमचे हाल हाल करणाराना काहींच प्रायश्चित्त नको काय?

[ टेबलावर अर्धवट विणून पडलेल्या झबल्याकडे पाहात ती पुढें येते. त्या झबल्यांत जणू काय छोटी बेबीच आहे, आणि तिच्यावर झडप घालायला कुणी येत आहे अशा आविर्भावानें तें झबलें दया चटकन् उचलून हातांत घट्ट धरते. त्या दोघी एकमेकींकडे पाहात दोन तीन क्षण उभ्या राहतात. ]

**गीता** : गरीब कामगाराच्या अर्भकासाठींच हें लोकरीचं विणकाम चाललंय वाटत? गिरिजाबाईला हीच मदत देणार होता? मोठी भाग्याची गिरिजाबाई. तिला मुल नाहींत म्हणून बरं, नाहीं तर तुमच्यावर भलतीच जबाबदारी पडली असती! म्हाताऱ्या आईचं काय, ती फार दिवस टिकणार नाहीं!

**दया** : चालती हो इथून—चालती हो इथून !

**गीता** : गिरिजाबाईंचा निरोप द्यायचा होता तो मीं दिला. जातें मी.

[ ती निघून जाते. क्षणभर दया तशीच उभी राहते. नतर खुर्चीवर अग टाकते, आणि दोन्ही हातांत तें अर्धवट विणलेलें झबलें घेऊन टेबलावर डोकें टेकते. हॉलचा दरवाजा उघडून बाबासाहेब येतात; आणि तिच्याकडे न पाहतां एका आरामखुर्चीवर अग टाकतात. त्याचा चेहरा क्षुब्ध दिसतो. ]

**दया** : (वर डोके करून काळजीच्या स्वरात) काय झाल, काय झालं, बाबा? (बाबासाहेब हॉलकडे बोट दाखवून काहीं तरी बोलण्याकरिता तोड उघडतात, पण बोलत नाहींत.) काय झाल ? काय केल कुणी ?—बाबा ?

[ बाबासाहेब काहींच बोलत नाहींत. दया हॉलच्या दरवाज्याकडे जाते. तिथच बाहेर येणारा दिवाकर तिला भेटतो ]

काय झाल दिवाकर ?

**दिवाकर** : धुमाळ काय वाटेल ते बोलले बाबाना. त्या माणसाला सभ्य भाषाच माहीत नाही !

**दया** : काय बोलले ते ?

**दिवाकर** : म्हणे तुमची साठी उलटली, आता तुम्हाला कांहीं तारतम्य उरलेल नाहीं ! छप्पन धुमाळाना पुरतील बाबा !

**दया** : नाहीं तर काय ! (दोघंहि आपल्या वडिलाकडे पाहतात. हॉलचा दरवाजा सताड उघडून हिरालालशेट बाहेर येतात. त्याच्याबरोबरच वाठारकर आहेत.)

**वाठारकर** : चाललंय् हें काहीं ठीक नाहीं, बुवा !

**हिरालाल** : (बाबासाहेबाजवळ जाऊन) बाबासाहेब, चला तुम्ही आत—धुमाळाना मनःपूर्वक वाईट वाटतय्. ते तुमची माफी मागायला तयार आहेत.

[ धुमाळ बाहेर येतात त्यांच्या मागोमाग हातांत कागद घेऊन कुळकर्णी येतात. धुमाळ बाबासाहेबांजवळ जातात. ]

**धुमाळ** : माझे शब्द मागं घेतो मी, बाबासाहेब. मी खरोखरच दिलगीर आहें.

[ बाबासाहेब ठीक म्हणून मान हलवतात. ]

**दया :** काहीं ठराव अजून झालेला नाहीं ना, हिरालालशेट?

[ हिरालाल नाहीं म्हणून मान हलवतात ]

**हिरालाल :** चेअरमनसाहेब, सर्व सभाच तिथून उठून इथ आलीय्. इथच पुढं चालू ठेवायची कीं तिथ परत जायच?

**वाठारकर :** (एका मोठ्या आरामखुर्चीत अंग टाकीत) तिथ काय नि इथ काय, आपण सर्व आहोंतच इथ—इथंच चालूं द्या झाल. कुठेहि बसू, पण काय तें एकदा ठरवून टाकूं या.

[ धुमाळ आणि हिरालालहि एकएका खुर्चीवर बसतात. एका टेबलाच्या कांठावर कुळकर्णी टेकतात. ]

**दया :** दिवाकर, जरा इथ येशील का? (त्याला घेऊन ती पलीकडच्या हॉलमध्यें जाते.)

**हिरालाल :** तुम्हीच विचार करा, चेअरमन्साहेब, सर्व काहीं ठीक आहे अशी स्वतःची उगाच समजूत करून घेण्यात काही अर्थ नाहीं. शेअर-होल्डराच्या वार्षिक सभेच्या आधी या सपाचा काहीं सोक्षमोक्ष जर आपण लावला नाहीं, तर डायरेक्टराना उभे चावून खातील सर्व शेअर-होल्डर्स!

**वाठारकर :** (आरामखुर्चीवरून डोकं वर करीत) काय? काय म्हणालात हिरालालशेट?

**हिरालाल :** शेअर-होल्डर्स आपल्याला उभे चावून खातील.

**बाबासाहेब :** खाऊं द्यात.

**धुमाळ :** खाऊ द्यात कसं? खातील म्हणजे काय आपल्याला बोर्डातून हाकलून देतील.

**हिरालाल :** (बाबासाहेबाना उद्देशून) आपल्याला प्राणाहून प्रिय असलेल्या तत्त्वासाठीं प्राणावर उदार व्हायला तयार आहें मी, पण स्वतःला मुळींच पसंत नसलेल्या तत्त्वासाठीं स्वतःचे धिंडवडे काढून घ्यायची आपली तयारी नाहीं.

**वाठारकर** : हें अगदीं बरोबर आहे तुमचं, हिरालालशेट. चेअरमन-साहेबानाहि हें पटलच पाहिजे.

**बाबासाहेब** : आपण पड खाल्ली तर साऱ्या साखर-धंद्याला त्यामुळें पड खावी लागेल.

**हिरालाल** : स्वतःच्या गळ्याला तात लागली असतांना साऱ्या साखर-धंद्याचा विचार हवा कशाला?

**बाबासाहेब** : सपाच्या सुरुवाती-सुरुवातीला तर तुम्ही सर्व लोक अगदीं शेंडी तुटो कीं पारबी तुटोच्या गोष्टी करीत होता. मग आताच का तुमचे पाय लटपटायला लागले?

**वाठारकर** : (कण्हत) आम्हाला वाटल होत, दोन-चार आठवड्यात कामगार कोलमडतील. पण चार महिने होऊन गेले तरी ते होते तसेच ताठ आहेत.

**बाबासाहेब** : मुळींच नाहीं—ते कोलमडायला आलेत.

**धुमाळ** : (उठून येरझाऱ्या घालीत) एक अब्रूदार व्यापारी म्हणून सागतों मी. लाखों रुपयाचा चुराडा झाला तरी बेहत्तर पण कामगाराना अन्नान्न करून धुळीला मिळवून टाकीन ही जिद्द उपयोगाची नाहीं! (अश्रुपूर्ण स्वरात) आपल्याला आता हे अगदी असह्य झालंय्. हा चाललेला प्रकार असाच चालू ठेवून शेअर-होल्डराना तोंड दाखवायची आपली तरी छाती नाहीं.

**वाठारकर** : अगदीं सोळा आणे बरोबर बोललात, धुमाळसाहेब.

**धुमाळ** : (स्वर चढवीत) बस्स् मी नि माझी जिद्द! माझ्या जिद्दीसाठीं तुमचे लाख रुपये मीं खड्डयात घातले हें शेअर-होल्डराना सागायला आपण तयार नाहीं! (बाबासाहेबाकडे दृष्टिक्षेप करीत) या बोलण्याला काहीं अर्थच नाहीं मुळीं! उगाच करायचा म्हणून विरोध मी करीत नाहीं, चेअरमनसाहेब.

**हिरालाल** : (आळवणीच्या स्वरात) चेअरमनसाहेबाना हें कळत नाहीं कीं काय, कीं आपण सर्व शेअर-होल्डराचे केवळ प्रतिनिधि आहोत. तत्त्वासाठीं लढे करायचं आपलं कामच नाहीं. शेअरहोल्डराना भरपूर नफा कमावून

देणं हेंच आपलं आद्य तत्त्व. कामगाराचे पगार वाढवायचे नाकारून संपामुळें होत असलेले नुकसान कधींच भरून येणार नाहीं. हा अगदीं सरळ हिशेब आहे. चेअरमनसाहेबाना तो काहीं सागायला पाहिजे, असं नाहीं· आमच्यापेक्षा त्याना तो चागला माहीत आहे. त्यातल्या त्यात फायदेशीर अशा अटीवर तडजोड होत असेल तर हा संप ताबडतोब मिटवून टाकावा ही गोष्ट चेअरमनसाहेब मान्य करतील याबद्दल मला मुळींच शका नाही.

**बाबासाहेब** : मी मुळींच मान्य करणार नाहीं !

[ सर्वजण चकित होऊन पाहतात. ]

**धुमाळ** : म्हणजे मूळ पदावर आहोत तिथच आहोत आपण ! (निराशेनें अंग टाकीत) सुभेदारवाडीच्या या भट्टीतच आमची पाचगणी होणारस दिसत !

**हिरालाल** : (औपरोधिक स्वरात) तुमच्या या हट्टामुळे धुमाळसाहेबाची किती गैरसोय होतेय् पाहिलीत, चेअरमनसाहेब ?

**धुमाळ** : माझी बायको आजारी आहे—तिला पाचगणीला न्यायचय् उद्या मला.

**वाठारकर** : आजारी माणसाला शक्य तितक्या लवकरच न्यायला पाहिजे हवेच्या ठिकाणी.

**धुमाळ** : इथ आजाराचीच काय, कितीक जणाचे मुडदे पडले तरी त्याची कुणाला पर्वा नाही !

[ हॉलच्या दरवाजानून दिवाकर येतो त्याची मुद्रा गभीर आहे बाबासाहेबांना उद्देशून तो बोलतो ]

**दिवाकर** : तुम्हाला बातमी कळली का, बाबा ? जाधवाची बायको वारली—

[ सर्वजण त्याच्या चेहऱ्याकडे पाहात राहतात. या बातमीचें पुरें गांभीर्य समजावून घेण्याच्या दृष्टीनें एकमेकांकडे पाहतात ]

दुपारीच तिला भेटायला दया गेली होती. घरात अन्नाचा कण नव्हता—औषधपाण्याची गोष्टच नको ! बस्स्—बस्स् झाल हें सर्व चाललय् तें !

[ स्तब्धता. कुणी कुणाच्या नजरेला नजर देत नाहीं. बाबासाहेब मात्र दिवाकराकडे स्थिर दृष्टीनें पाहात आहेत. ]

**वाठारकर** : ती बिचारी मेली ही वाईट गोष्ट झाली, पण आम्हीं कांहीं केलं असत तर तिच मरण थोडंच टळणार होत?

**धुमाळ** : (अस्वस्थपणें) बरेच दिवस ती आजारी होती. तिच्या मरणाची आमच्यावर कशी काय जबाबदारी येते? आपल्याला नाही वाटत आपण काहीं करू शकलो असतो अस.

**दिवाकर** : (आवेशानें) सर्व जबाबदारी आपणावरच आहे. आपण खात्रीनं काहीं तरी करू शकलो असतो.

**बाबासाहेब** : ही लढाई आहे!

**दिवाकर** : बायाबापड्याविरुद्ध पुकारलेली?

**हिरालाल** : असल्या या लढायात बायाबापड्याचे विनाकारण हाल होतात हे खरं!

**दिवाकर** : होतात ना? मग हे माहीत असूनहि लढा चालवणारे आपण त्याबद्दल जबाबदार नाही का?

**बाबासाहेब** : अध्यक्षांच्या लोकाची हीं असली काम नाहींत.

**दिवाकर** : तुम्हाला मला काय म्हणायच असेल तें म्हणा, पण मला किळस आलाय् या सर्व प्रकाराचा. इतक ताणून धरायला नको होत आपण.

**धुमाळ** : 'समाचार' पत्राचा तो हलकट सपादक उद्या काय लिहितो तें पाहा. सपवाल्याच्या बायकापोराना हालहाल करून मारण्याचा भाडवल-शाहीचा कट! जाधवाच्या बायकोचा पहिला बळी घेतला!—लोकांना काय, लोक मिटक्या मारीत वाचतील.

**दिवाकर** : लोकाची काय चूक त्यात?

**वाठारकर** : म्हणजे काय? म्हणता काय तुम्ही, दिवाकर? असल भलत काहीं ऐकायला आपण तयार नाही!

**दिवाकर** : ऐकलच पाहिजे! त्यातून सुटका नाहीं, वाठारकरसाहेब!

**बाबासाहेब** : बस्—पुरे!

**दिवाकर** : (त्याच्याकडे पाहात, संतापानें) माफ करा—मी पुरे करूं शकत नाही. मला जें वाटत ते मी स्पष्टपणे सागणार आहे. कामगाराची भयकर

स्थिति झाली आहे. काहींनीं आठ आठ दिवस अन्न पाहिलेलं नाहीं. बहुतेकाचीं पोटं पाठीला लागलीत. बायाबापड्याना—अर्भकाना तर पाहावत नाहीं! (वाठारकर अस्वस्थपणे आपल्या खुर्चीत चुळबुळतात.) आपण जाणूनबुजून त्याचे हाल करतों आहोत, अस मला म्हणायचं नाही. पण यापुढें त्याचे हाल उघड्या डोळयानी पाहात राहणं माणुसकीला सोडून होईल. त्याच्या हातानीं हा आपला कारखाना चालतो. ते आपले कुणीच नाहींत अस आपल्याला म्हणता येणार नाहीं. त्याच्या बायकामुलाचा तर या संपाशीं काहींच संबध नाही. निरपराध बायकामुलाच्या हत्येचं पातक डोक्यावर घेण्यापेक्षा या बोर्डातून राजीनामा देऊन मी बाहेर पडेन.

[ बाबासाहेबाखेरीज इतर सर्व उठून उभे राहिलेत. आपल्या खुर्चीचे दोन्ही हात घट्ट धरून बाबासाहेब दिवाकराकडे रोखून पाहात आहेत ]

**वाठारकर** : ही हत्येची बित्येची गोष्ट म्हणजे जरा फार होतेय्, दिवाकरसाहेब!

**हिरालाल** : दिवाकरसाहेबाचं हें बोलण म्हणजे फारच भडक बोलण झालं.

**धुमाळ** : फारच भडक!

**दिवाकर** : (बेफामपणें) भडक, भडक म्हणून तुम्ही अंग झाडूं शकत नाही. बायकापोराच्या उपासमारीची सर्व जबाबदारी आपल्या डोक्यावर आहे, नि मी ती यापुढें मुळींच घेऊ इच्छीत नाहीं.

**वाठारकर** : हे काय बोलण झाल?

**धुमाळ** : आम्हीहि ती घेऊ इच्छीत नाहीं.

**दिवाकर** : तुम्ही घेऊ इच्छीत नाहीं, मी इच्छीत नाहीं, पाचापैकीं आपण चार जण घेऊं इच्छीत नाहीं, मग या थराला गोष्टी आल्या का? उपासमारीनं कामगार जेरीला येतील, अशी चोरटी आशा आपल्यापैकीं प्रत्येकाला वाटत होती, हेंच कारण कीं नाहीं? कामगार काहीं अजून जेरीला आले नाहींत, पण एका कामगार स्त्रीला मात्र आपण सुखरूपपणें यमसदनाला पोहोंचविली!

**वाठारकर** : हें बोलणं आपल्याला मुळींच पसत नाहीं. आम्ही माणसं आहोंत कीं राक्षस?

**दिवाकर** : आहोंत माणसच, पण इतर प्राण्यापेक्षा माणसांत जें विशेष असत

ते—म्हणजे पुढं काय होईल त्याची आधीच कल्पना करण्याची शक्ति, आपणाला सोडून गेलीय् !

**धुमाळ :** मला पूर्ण कल्पना होती काय होणार आहे त्याची.

**दिवाकर :** मग या थराला तुम्ही गोष्टी का येऊ दिल्यात ?

**धुमाळ :** (बाबासाहेबाकडे पाहात) आम्ही दिल्या ?

**दिवाकर :** कल्पना असूनहि काहीच न करणारे कमी दोषी ठरत नाहींत. तुम्हा-आम्हाला कल्पना होती, तर आपण काहीं तरी वेळेवर करायला पाहिजे होत. आपल्या गलथानपणामुळे एक स्त्री नाहक प्राणाला मुकली. आणखी किती मुकणार आहेत कुणाला ठाऊक !

**वाठारकर :** ही भाषा बद करा अशी पुन्हा एकदा तुम्हाला नम्र विनति करतो, दिवाकरसाहेब !

**दिवाकर :** माफ करा, वाठारकरसाहेब. पण ही भाषा बोलल्याखेरीज गत्यतर नाही मला !

**वाठारकर :** तर मग तुम्ही बोलता आहा तोपर्यंत मी कानात बोट घालून बसतो.

[ कानांत बोटे घालतात ]

**हिरालाल :** तुमच्या वडिलाखेरीज तडजोडीच्या विरुद्ध आमच्यापैकी कुणीच नाहीत, दिवाकर.

**दिवाकर :** इथली एक एक भयकर घटना शेअर-होल्डराना कळली तर—

**हिरालाल :** शेअर-होल्डराच काहीं सागू नका आम्हाला तुम्ही, दिवाकर. काळजाचा विकार बळावल्यामुळें सुभेदारवाडीतली एक बाई मेली म्हणून कपनीचे शेअर होल्डर अगदीं कासावीस होतील असं मला वाटत नाहीं !

**दिवाकर :** आपण या थराला गोष्टी आणल्या म्हणून तिच्या काळजाचा विकार बळावला, ही गोष्ट पाळण्यातल पोरहि सागेल, हिरालालशेट. ही भयकर घटना आपल्या उलट्या काळजाचा परिपाक आहे, हें न समजण्याइतका मूर्ख इथ कुणी असेल असं मला वाटत नाहीं. (ही चर्चा चालू असता बाबासाहेबाची दृष्टि दिवाकराच्या चेहऱ्यावर खिळलेली असते.

काहीं तरी बोलण्याकरिता ते उठणार असें दिसतें. पण दिवाकर पुन्हा बोलू लागल्याबरोबर ते थाबतात.) आम्ही चुकलो कीं कामगार चुकले कीं आणखी कुणी चुकल याची शहानिशा मला करायची नाही—

**हिरालाल** : न करून कस चालेल? आता ती होईलच. जाधवाच्या बायकोची केस कॉरोनरच्या कोर्टात गेल्याशिवाय राहणार नाहीं, अस मला वाटत. ज्यूरीतल्या लोकाना कामगाराबद्दलच सहानुभूति वाटणार. आपल्याबद्दल ते आता काय काय तारे तोडतील ते ऐकायची आपण तयारी ठेवली पाहिजे.

**वाठारकर** : तुम्हीसुद्धा हिरालालशेट काय बोलता हें? कॉरोनरपुढे चौकशी करण्यासारखं या केसमध्ये काय आहे? उगाच काहीं तरी भयकर बोलायच म्हणजे काय?

**दिवाकर** : वर्तमानपत्रे काय म्हणतील? कॉरोनर काय करील? हा भेकडपणा आता पुरे झाला. काय करायला पाहिजे तें ताबडतोब करून टाकू या.

**हिरालाल** : भेकडपणा हा शब्द जरा कडक आहे, दिवाकरसाहेब. पण कोणतहि पाऊल टाकायच तें आपण सावधगिरीनच टाकल पाहिजे. एक कामगार स्त्री मेल्याची बातमी कळल्याबरोबर कामगाराच्या मागण्या आपण एकदम मान्य करून टाकल्या तर मात्र भेकडपणाचा आरोप आपणावर येईल.

**धुमाळ** : पाऊल सावधगिरीनेच टाकायला पाहिजे. कसलीच बातमी आपल्या कानावर आलेली नाहीं अस दाखविल पाहिजे. फेडरेशनचा माने येणारच आहे कामगाराचा निर्णय घेऊन. त्याच्याकडे तडजोडीच सर्व काहीं सोपवावं म्हणजे झाल. नाहीं तरी यापूर्वीच तें करायला पाहिजे होत म्हणा.

**वाठारकर** : नाहीं तर काय! (दिवाकराकडे पाहात) मात्र दिवाकरसाहेब, तुमच तें भडक बोलण आपल्याला मुळींच पसत नाहीं. उलट्या काळजाच धोरण—बायाबापड्याची उपासमार—बायकापोराची हत्या—हे काय बोलणं झाल? छे—छे—

**दिवाकर** : हें सर्व बोलण अक्षरशः मी पुन्हा बोलेन. मला त्याची मुळींच लाज वाटत नाहीं.

[ तो आणखी काहीं बोलणार तोच वाठारकर कानात बोटें घालतात कुळकर्णी

हातांतले कागद वर करून सर्वांचें लक्ष कागदाकडे वेधून घेतात तेव्हा सर्वांच्या ध्यानात येते कीं सभा आणि अध्यक्ष बाजूला सारून आपण आपापसात चर्चा चालविली आहे! काहीतरीच केल्याचा भाव प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसतो सर्वजण गुपचूप आपापल्या जागेवर जाऊन बसतात. दिवाकर मात्र खिडकीकडेच उभा आहे ]

**धुमाळ :** (झालेले सर्व पुसून पुन्हा नव्या पाटीवर सुरू करण्याच्या आविर्भावानें) तो कॉरोनर, ती ज्यूरी नि दिवाकरसाहेबानी रंगवलेले ते भडक चित्र आपण आता विसरून जाऊ या. मी सभेपुढें सरळ सरळ ठरावच मांडतो. डायरेक्टर बोर्डाची सभा ठराव करते, कीं फेडरेशनचे श्री. माने यांच्या हातीं तडजोडीने संप मिटविण्याचें काम सुपूर्द करण्यात यावें. या ठरावाला दुजोरा कुणाचा आहे ? (कुळकर्णी ठराव लिहून घेत आहेत.)

**हिरालाल :** या ठरावाला मी दुजोरा देतो.

**धुमाळ :** ठीक आहे. हा ठराव मताला टाकण्याची चेअरमनसाहेबाना मी विनंति करतो.

**बाबासाहेब :** (एक मोठा श्वास टाकून धीमेपणाने) दुष्ट, भेकड, उलट्या काळजाचे असे अनेक आरोप इथं डायरेक्टरावर करण्यात आले. (धुमाळ आणि वाटारकर यांच्याकडे उपरोधपूर्ण तिरस्कारानें पाहात) आम्ही नाहीं, आम्ही नाही म्हणून प्रत्येकजण अंग झाडू लागला! ठीक आहे. ही सर्व जबाबदारी मी माझ्या एकट्याच्या शिरावर घ्यायला तयार आहें. मला हे शहात्तराव वर्ष आहे. या कारखान्याचा पाया घातला गेला तेव्हापासून गेली बत्तीस वर्षं कंपनीच्या बोर्डाचा अध्यक्ष म्हणून मी काम पाहतो आहे. (दिवाकराकडे पाहात) याचा जन्म नंतर एका वर्षानं झाला. कारखान्यापेक्षा हा एका वर्षानें लहान आहे. (दिवाकर खाली मान घालतो.) या कारखान्याला बत्तीस वर्षं झालीं. पण कामगाराकडून गेली पन्नास वर्षं मी निरनिराळ्या धंद्यात काम करून घेतोय्. त्यांच्या गमजा मीं कधींच चालू दिलेल्या नाहीत—माझ्यावर ते कधीच कुरघोडी करू शकले नाहींत. याच कंपनीत आतापर्यंत चार संप झाले, नि चारहि वेळा दांती तृण धरून त्याना मी शरण यायला लावलं. (धुमाळाकडे पाहात) माझी साठी केव्हाच

उलटून गेलीय् म्हणतात. खरं आहे तें. पण लढाईला तोंड लागलं असता रणांगणावरून पळून जाण्याइतकी माझी बुद्धि अजून नाठी झालेली नाहीं ! (त्याचा आवाज बोलता बोलता चढतो आहे. हॉलचा दरवाजा उघडून दया आत येते. तिच्या मागेच देशमुख आहेत. ते तिच्या दंडाला धरून तिला तिथेच थाबवतात.) आमच्या कारखान्यात तरी कामगाराना कसल्याच प्रकारचा अन्याय होत नाही. त्याना योग्य पगार बिनचूक मिळतो. त्याच्या कोणत्याहि योग्य गाऱ्हाण्याचा ताबडतोब निकाल लावण्यात येतो. आता म्हणे काळ फिरलाय्. असेल, पण काळाबरोबर माझं तरी डोक फिरलेल नाहीं ! ते फिरणारहि नाही. म्हणे मालकात नी कामगारात काहीं भेद नाही. वाः ! मग जमीन नि अस्मानातहि काहीं भेद नाहीं ! माणसामाणसात नैसर्गिक भेद आहेत. दोन माणस एकत्र आली कीं त्यातला अधिक हुशार असेल तोच सत्ता गाजवणार. म्हणे भांडवलदार नि मजूर याचे हितसबध एकच आहेत ! होय, होय—आगीचे नि पाण्याचे हितसबध एकच आहेत ! म्हणे डायरेक्टर बोर्ड हा यत्राचा एक भाग तर कामगार हा दुसरा ! गाढव-पणाचं विधान आहे हे ! डायरेक्टर बोर्ड हेच सबध यत्र. हे यत्रच आपल बरं काय नि वाईट काय ते ठरवणार, नि एकदा ठरवल कीं कामगार काय करतील, वर्तमानपत्र काय म्हणतील, शेअर-होल्डराना काय वाटेल असल्या भीतीच्या आहारीं न जाता, किंवा कोणाच्या रागालोभाची पर्वा न करता ठरवलेल व्यवस्थितपणें पार पाडणार. (क्षणभर थाबून ते दिवाकराकडे पाहात बोलू लागतात.) कामगाराना वागवण्याची एकच रीत आहे, ती म्हणजे आपण हुकूम द्यायचा नि त्यानीं तो निमूटपणे पाळायचा. माझं म्हणण सागतो, त्याच म्हणण ऐकतो—यत्राचा एक भाग ते, तर दुसरा भाग आपण,—नव्या पिढीच्या असल्या या अर्धवटपणामुळेच गोष्टी या थराला गेल्याहेत. कणखरपणाच्या अभावाला हे नवे लोक समाजकल्याणाच धोरण अस अगड-बब नाव देतात ! या लिबलिबीत हळवेपणानच घात झालाय्. मी याला मध्यमवर्गीय बावळटपणा म्हणतो. मालक ते मालक, नि कामगार ते कामगार. कामगाराची एक मागणी मान्य केली कीं आणखी पन्नास नव्या मागण्या ते तुमच्यापुढें ठेवणार. त्याची भूक वाढतच जाणार. त्याना मी मुळींच दोष देत नाहीं. त्याच्या जागीं मी असतों तर मींहि तेच केल असतं. पण

त्याच्या जागीं मी नाहीं. माझी जागा कोणती ते मला पूर्णपणें माहीत आहे, नि ती जागा सोडण्याचा माझा मुळींच विचार नाहीं. केवळ अप्पलपोटे-पणानें मी हे बोलत नाहीं. सर्व देशाच भवितव्य या प्रश्नाकडे स्वच्छ दृष्टीनें पाहण्यावर अवलबून आहे. एकदा तुम्हीं धरसोडीनें त्याची जागा त्याना सोडू दिली कीं देशात बजबजपुरी माजेल. त्या बजबजपुरीमुळें तुम्ही तर धुळीला मिळालच, पण तेहि धुळीला मिळतील. कारण समाजयत्र चाल-वण्याकरिता ते जन्मालाच आलेले नाहींत. हम करे सो कायदा समजणारा मी एक सत्तालोभी हुकुमशहा आहे, अशी माझ्यासंबधी तुमच्यापैकीं काहींची कल्पना आहे. खर नाहीं ते—निर्बुद्ध झुडीपुढें मान वाकवून समाज रसातळाला पोहोचवण्याचे जे हे नवे उद्योग चाललेत त्यात सामील होण्यापेक्षा माझ्या हातान माझी मान कापून घेईन मी! (ते थाबतात. टक लावून समोर जणू काय दूरच्या भविष्यकाळाकडे ते पाहात आहेत. संपूर्ण स्तब्धता आहे. दोन तीन क्षणानी बाबाजी प्रवेश करतो. बाबासाहेबाखेरीज इतर सर्व त्याच्याकडे नजरा वळवतात.)

**बाबाजी** : (बाबासाहेबाना उद्देशून) साहेब, संपसमितीचे लोक बाहेर आलेत—

**बाबासाहेब** : (त्याला हाताने बाहेर जायला सागतात.) त्याना म्हणाव थोडा वेळ थाबा. (बाबाजी जातो. दिवाकराकडे पाहून) यानं माझ्यावर चढव-लेल्या हल्ल्याला उत्तर देण प्राप्त आहे. एक कामगार स्त्री मेली, तिच्या हत्येच पातक माझ्या डोक्यावर आहे. बायाबापड्याची, अजाण अर्भकाची उपासमार चालू आहे, तिचीहि जबाबदारी माझीच असं—

**दिवाकर** : आपली सर्वांचीच असं मी म्हणालो.

**बाबासाहेब** : एकूण एकच. (भावनापूर्ण पण खणखणीत आवाजात ते बोलत आहेत.) युद्ध पुकारायच त्यानीं नि युद्धात त्याची हानि होऊं लागली कीं तिची जबाबदारी माझ्या डोक्यावर आहे! हा अजबच न्याय म्हणायचा! ते जिकले नि त्याच्या टाचेखाली मी चिरडला जाऊ लागलों तर मी नाहीं तक्रार करणार. म्हणे त्याच्या बायकामुलाचे हाल होताहेत. लढा पुकारतांना त्यानीं याचा विचार करायला हवा होता—मी नव्हे.

**दिवाकर :** या लढ्यातले दोन्ही पक्ष समबल आहेत का, बाबा? त्याची नी आपली परिस्थिति सारखीच आहे का? त्या बिचाऱ्याकडे सपाखेरीज दुसर हत्यारच नाहीं.

**बाबासाहेब :** नि तें आमच्या विरुद्ध कसं वापरावं हे तू त्याना चागल शिकवतोय्स! शत्रूची बाजू घेण ही अलीकडच्या पिढीची एक नवी फॅशन दिसते! मला ही फॅशन पसत नाहीं. स्वतःच्या फेडरेशनशीहि त्यानी तटा केला, हाहि माझाच दोष असेल!

**दिवाकर :** दोषाच्या वाटणीचा हा प्रश्न नाही. हा साध्या माणुसकीचा प्रश्न आहे.

**बाबासाहेब :** माणुसकी न्याय्य बाजूलाच दाखवली पाहिजे.

**दिवाकर :** प्रत्येक जण आपली बाजू न्याय्य आहे असं समजतो!

**बाबासाहेब :** (आवेगाने थरथरत) मी अन्याय चालवलाय, पोराबाळाची हत्या करतोय्, अस तुला म्हणायचय्—

[ दिवाकर शहारल्यासारखें करतो खोलीत भीतीचें वातावरण पसरतें ]

**हिरालाल :** चेअरमनसाहेब, अस कुणींच म्हटलेलं नाहीं.

**बाबासाहेब :** कुणीच नाही कस? प्रत्यक्ष माझा मुलगाच म्हणतोय्. या नव्या पिढीच मनच मला कळत नाही! कसल्या लिबलिबीत पदार्थाच याच मन केलय् कुणाला ठाऊक!—

[ सर्वजण अस्वस्थपणें चुळबुळतात. बाबासाहेब मोठ्या कष्टानें स्वत ला आवरून स्वस्थ बसतात. ]

**दिवाकर :** (शातपणें) बाबा, मीं तुमच्या एकट्यावर कसलाच आरोप केलेला नाहीं. आपणा सर्वांविषयींच मी बोलत होतो.

[ ते दोघे बराच वेळ एकमेकांकडे पाहात राहतात कांहीं वेळानें बाबासाहेबहि वैयक्तिक बाचाबाची पुरे झाली अशा अर्थाची मुद्रा करून मागें रेलतात. डोकें शांत करण्याकरिता कीं काय कपाळावर हात ठेवतात त्यांना काहीं होतय् कीं काय असें वाटून सर्व मडळी पुढे होतात; पण ते हाताने सर्वांना आपापल्या जागेवर जायला सागतात. ]

**बाबासाहेब :** (शातपणें) धुमाळानी माडलेला ठराव मी मताला टाकतो. (प्रत्येकाच्या चेहऱ्याकडे पाहात) मत घेण्यापूर्वी एक गोष्ट मला स्पष्ट केली पाहिजे. हा ठराव पास करणं म्हणजे आतापर्यंतच्या आपल्या सर्व कार्यावर बोळा फिरवण्यासारख आहे. आपण आपल्या कर्तव्याला कायमची सोड-चिठ्ठी दिल्यासारख होणार आहे. काम करणारे नि काम करून घेणारे असे दोन वर्ग जगात आहेत काम करून घेणारे आहेत म्हणून समाज चालला आहे. या वर्गाचा आपण घात करणार आहोत—स्वतःचा घात करणार आहोत. एकदा पड खाल्ली की पदोपदी आपणाला पडच खावी लागणार, ही गोष्ट अगदी सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे. कामगारापुढ एकदा मान टाकलीत कीं ते तुमच्या मानगुटीवर कायमचे बसले म्हणून समजा. त्यानीं लाथा मारायच्या आणि तुम्ही त्या निमूटपणें मारून घ्यायच्या हेंच तुम्हाला पाहिजे असेल तर हा ठराव अवश्य पास करा. (ते पुन्हा प्रत्येकाच्या चेहऱ्यावरून नजर फिरवतात. नजर स्थिर करतात सर्वांचे डोळे जमिनीवर खिळलेत. कुळकर्ण्याकडे बाबासाहेब कागदाकरिता हात पुढें करतात. कुळ-कर्णी त्याच्या हातात कागद देतात. ते वाचू लागतात.) फेडरेशनचे श्री. माने याच्या हाती तडजोडीनें सप मिटवण्याचे काम सुपूर्द करण्यात यावें. बापूसाहेब धुमाळ यानी माडलेल्या या ठरावाला हिरालालशेट याचा दुजोरा आहे. (एकदम शक्ति सचरल्यासारख्या आवाजात) ठरावाच्या बाजूचे जे असतील त्यानीं हात वर करावे.

[ काही वेळ कुणीच कांही हालचाल करीत नाही बाबासाहेब कांही बोलण्याकरिता तोड उघडतात, तोंच धुमाळ आणि हिरालालशेट हात वर करतात. नतर वाठारकर हात उचलतात शेवटी दिवाकराचा हात वर जातो खाली केलेली मान तो वर करतो ]

कुणी विरुद्ध आहे? (बाबासाहेब स्वतःचा हात वर करतात.) ठराव पास! (खणखणीत आवाजात) या बोर्डाच्या अध्यक्षपदाचा मी राजीनामा देत आहें.

[ दिवाकर एक लांब निःश्वास टाकतो भयानक स्तब्धता. बाबासाहेब जागच्या जागी खिळल्यासारखे बसले आहेत. भोवळ आल्यागत त्यांच्या डोक्याचा तोल जातो आहे असे दिसते पण दुसऱ्याच क्षणी ते डोके वर करतात शहात्तर

वर्षांच्या जीवनांतलें त्याचें सारें कर्तृत्व उसळून वर आल्याचा भास होतो ]

**बाबासाहेब :** सद्गृहस्थहो, पन्नास वर्षे मी धंदा करतोय्—आज तुम्हीं मला खाली मान घालायला लावलीत. बोलवा आत संपसमितीला. (समोर शून्य दृष्टीनें पाहात ते बसले आहेत. इतर डायरेक्टर उठून आपापसात बोलू लागतात. कुळकर्णी भीत भीत दरवाज्याकडे जाऊन संपसमितीला आत बोलावतात. देशमुख जवळजवळ ओढीत दयेला बाहेर नेतात.)

**धुमाळ :** संपसमितीला सांगायच काय ? माने इतक्यात यायला हवा. तो यायच्या आधी संपसमितीला भेटून आपण करणार काय ?

**कुळकर्णी :** (आत येणाऱ्या संपसमितीला) या—या.

[ जावजीमास्तर, सावळे, साटम आणि शिवराम पवार आत येतात कागद घेऊन कुळकर्णी टेबलाकडे बसतात सर्वांचे डोळे बाबासाहेबाच्या चेहऱ्याकडे लागले आहेत. ते काहींच करीत नाहींत ]

**हिरालाल :** काय, जावजी, काय करायच ठरवलय् तुम्हीं ? तुमच्या सभेत काय ठरल ?

**पवार :** फेडरेशनच्या मान्याना सांगितलय् सर्व काहीं आम्हीं. त्याचीच वाट पाहतोंय्. आमच्या वतीन ते बोलतील.

**हिरालाल :** होय का रे, जावजी ?

**जावजी :** (तिरसटपणें) होय. जाधव नाहीं येणार आज. त्याची बायको दुपारीं वारली.

**वाठारकर :** बिच्चारी ! च्—च्—बिचारी !

[ बाबाजी प्रवेश करतो ]

**बाबाजी :** बाहेर माने आलेत.

**धुमाळ :** घेऊन ये त्याना आत.

[ बाबाजी जातो माने प्रवेश करतो त्याच्या हातात एक गुंडाळलेला कागद आहे. सर्व डायरेक्टराकडे आणि संपसमितीकडे मान लववून तो पाहतो, आणि कुळकर्ण्यांच्या टेबलाकडे जाऊन उभा राहतो कुळकर्णी त्याच्याशीं कुजबूज करीत आहेत ]

**धुमाळ** : तुमचीच वाट पाहात होतो, माने. काही तरी करायला पाहिजे आपल्याला—

[ बाबाजी प्रवेश करतो ]

**बाबाजी** : जाधव येतोय्.

**धुमाळ** : हू—(बाबाजी जातो. जाधव घाईघाईने प्रवेश करतो. बाबासाहेबाकडे पाहात तो बोलतो. त्याचा चेहरा सुकून गेला आहे. तो एकदम म्हातारा झालेला दिसतो.)

**जाधव** : मला थोडा उशीर झाला यायला. घरी—घरी—घरी अडचण होती. (संपसमितीला) काही बोलण झाल नाही ना अजून?

**जावजी** : नाहीं—पण वेड्या, घर सोडून तू इथ—

**जाधव** : (डायरेक्टराना) आपल्या परिस्थितीचा फेरविचार करून काय तो शेवटचा जबाब द्या, अस सकाळी आपण आम्हाला सांगितलत. फेरविचार केला आम्हीं, नि शेवटचा जबाब द्यायलाच आत्ता आलो आहोंत. (बाबासाहेबाना) आमची एकहि मागणी आम्ही माग घ्यायला तयार नाहीं. सर्व मागण्या जशाच्या तशा मान्य होईपर्यंत हा लढा चालू राहणार. आपण आलात तसेच परत जावं हे उत्तम!

[ बाबासाहेब त्याच्याकडे पाहतात पण काही बोलत नाहींत सपसमितीचे लोक एकमेकाकडे गोंधळलेल्या नजरेनें पाहतात ]

**माने** : जाधव! जाधव!

**जाधव** : (त्याच्याकडे एक जळता दृष्टिक्षेप टाकून, बाबासाहेबाकडे पाहतो.) मला वाटत, आमचा जबाब अगदीं स्पष्ट नि सुटसुटीत आहे. तुम्हाला वाटल होत कीं नाक मुठीत धरून आम्ही शरण येऊ, अं? आमची पोट तुम्ही मारू शकता, आमच्या मनाना नाहीं तुम्ही मारू शकत. जा—आलात तसे परत जा!—

[ बाबासाहेब काहीच बोलत नाहीत, हालत नाहीत असे पाहून तो किंचित् त्याच्याजवळ जाऊन त्याच्या तोंडाकडे अस्वस्थपणें पाहतो ]

**दिवाकर** : गिरिजाबाईचं ऐकून फार वाईट वाटल आम्हाला, जाधव—

**जाधव :** आपल्या बर-वाईट वाटण्याचा मला काहींच उपयोग नाहीं, दिवाकरसाहेब. आपले वडील का काहीं बोलत नाहींत ?

**माने :** (हातातले कागद हलवीत) जाधव—ए—जाधव !

**जाधव :** (अधीर उत्कटतेने बाबासाहेबाना विचारतो) आपण बोलत का नाहीं ?

**माने :** जाधव, ए—

**जाधव :** (एकदम वळून) काय, आहे काय प्रकार हा ?

**माने :** (गभीरपणे) प्रकार असा आहे कीं तू विचारण्यासारख किंवा तुला उत्तर देण्यासारख आता काहीं उरलेल नाही. खूपच नव्या घडामोडी झाल्यात—

[ माने कुळकर्ण्याना खूण करतो कुळकर्णी प्रत्येक डायरेक्टराकडे एक कागद घेऊन जातो, व त्याच्या त्यावर सह्या घेतो माने हातातला कागद जाधवला दाखवतो ]

हा करार पाहा, संपसमितीच्या त्याच्यावर सह्या आहेत. याच कराराच्या नकलेवर डायरेक्टरानीहि सह्या केल्यात. एक—(वाचू लागतो.) भट्टी-खात्याखेरीज इतर खात्याच्या सर्व मागण्या मान्य करण्यात येत आहेत. रविवारच्या कामाचा दुप्पट रोज देण्यात येईल. या करारावर सह्या होताच दुसऱ्या दिवसापासून कामगार कामावर रुजू होतील. संप संपला. समजल ?

**जाधव :** [ त्याच्या हातातला कागद घेऊन त्यावर नजर फिरवतो कागद परत देत चवताळलेल्या चित्त्यासारखा संपसमितीकडे वळतो पवाराखेरीज सर्वजण माना खालीं घालतात पवार मात्र त्याच्या नजरेला नजर देतो ]

असा माझ्या पाठीत सुरा खुपसलात ? तिचा घरी प्राण जात होता—तेव्हाहि तुमच्या खांद्याला खांदा लावून मी उभा होतों—नि माझी पाठ वळल्याबरोबर तुम्ही असा सुरा खुपसलात ? ही वेळ दगाबाजीसाठी साधलीत ?

[ पवार, जावजीमास्तर, सावळे, साटम एकदम बोलतात. ]

**पवार :** बस्स कर तुझी उर्मट वटवट ! कुणीं कुणाची दगाबाजी केलेली नाहीं.

**जावजी** : लोक सोसनार तरी किती तुझी दादागिरी, बाबा ?

**सावळे** : मी तुला पहिल्यापासून सागत होतों—

**साटम** : तोंड सांभाळून बोल.

**जाधव** : ही वेळ—तिची प्राण जाण्याची वेळ साधलीत अं ?

**माने** : (कुळकर्ण्यांकडून डायरेक्टराच्या सह्यांचा कागद घेतो. आपल्याकडला कुळकर्ण्यांना देतो.) कराराचे कागद सगळे ठीक आहेत. जावजी, साटम, तुम्ही जा आता.

[ सपसमितीचे लोक इकडेतिकडे पाहात हळू हळू बाहेर जातात ]

**धुमाळ** : (अस्वस्थ आवाजात) आपलहि आता तस काही काम नाही. (दरवाज्याकडे जात) साडेसातची गाडी मिळेल, वाठारकर. तुम्ही येणार ना त्याच गाडीनं ?

[ वाठारकर व हिरालाल बाहेर पडण्याकरिता उठले आहेत ]

**वाठारकर** : हो, तीच बरी आहे गाडी—

[ जाधव बोलतो तें ऐकण्याकरिता वाठारकर आणि हिरालाल दारातच थबकतात ]

**जाधव** : (बाबासाहेबाकडे पाहात) आपण या करारावर सही केलेली नाही ? चेअरमनसाहेबाच्या सहीशिवाय करार पुरा कसा होईल ? आपण ही तडजोड कधीच मान्य करणार नाही. (बाबासाहेब न बोलता त्याच्याकडे नुसते पाहात राहतात.) आपल्याबद्दल माझी पूर्ण खात्री होती. नाहीं केलीत आपण सही—बोला, नाहीं केलीत ना ?

**माने** : (हातातला डायरेक्टराच्या सह्यांचा कागद वर करून) सबध बोर्डाच्या या कागदावर सह्या आहेत !

[ जाधव त्याच्या हातातला कागद घेऊन त्याच्यावर पुन्हा एकदा नजर फिरवतो. त्याच्या हातात कागद परत देतो, आणि दोन्ही हातानी डोळे दाबून धरतो ]

[ वाठारकर जाता जाता कुळकर्ण्याला उद्देशून बोलतात ]

**वाठारकर** : चेअरमनसाहेबावर नीट लक्ष ठेवा, कुळकर्णी. त्याची प्रकृति मुळींच चागली नाहीं. दुपारी ते जेवलेहि नाहींत. कामगाराच्या मुलाना शंभर रुपयाची मिठाई वाटा—पैसे माझ्या नावावर घाला.

[ वाठारकर सकटातून सुटल्यासारखे बाहेर पडतात जाधव आणि बाबासाहेब याच्या चेहऱ्याकडे गोरेमोरे होऊन आळीपाळीनें पाहात असलेले हिरालालशेट त्याच्या मागून बाहेर पडतात. दिवाकर जमिनीवर दृष्टि लावून कोचावर बसला आहे कुळकर्णी टेबलाकडे बसून सभेचे कागद पुरे करीत आहे. मध्यें उभा राहून माने गभीरपणें जाधवाकडे पहात आहे ]

**जाधव :** (बाबासाहेबाना) आपण यापुढें कपनीचे अध्यक्ष नाहीं तर? (वेड्यासारखा हसत) ह्यः! ह्यः! ह्यः! स्वतःच्या अध्यक्षाला त्यानी धुडकावून लावल अं? स्वतःच्या अध्यक्षाला—स्वतःच्या म्होरक्याला?—ह्यः! ह्यः! ह्यः! (एकदम हसायचा थाबतो. भयानक गभीरतेनें) हू!—म्हणजे तुमचा तुमच्या अनुयायानी नि माझा माझ्या अनुयायानी गळा कापला, सुभेदारसाहेब—अं?

**माने :** (पुढें होऊन जाधवाचा दड धरीत) काय हें जाधव?—झाल इतक पुरे नाहीं का झाल? जा—घरी जा आता—

**जाधव :** (हिसडा देऊन दड सोडवीत) घरीं? (गात्रे पागळल्यासारखा होतो. क्षीण आवाजात) घरीं?—

**दया :** (पुढें जाऊन बाबासाहेबाचा हात धरून उठवीत) तुमच्या खोलीत चला, बाबा!

[ मोठ्या कष्टाने बाबासाहेब उठतात, जाधवाकडे ते पाहतात. तो त्याच्याकडे पाहात राहतो काहीं क्षण एकमेकाच्या नजरेला नजर देऊन दोघे उभे राहतात. बाबासाहेब उजवा हात जणु काय जाधवाला अभिवादन करायला उचलीत आहेत असें वाटतें पण हात पुरा वर जात नाहीं—तसाच खाली पडतो जाधवाच्या डोळ्यातलें द्वेषाचें पाणी निवळून तो विस्मयानें बाबासाहेबाकडे पाहतो आहे. दोघांचीहि डोकीं जणु काय परस्पराबद्दलच्या आदरानें किंचित् लवलेलीं दिसतात बाबासाहेब खोलीकडे जायला वळतात. पडदा बाजूला करून ते आत पाऊल टाकणार तोंच त्याचा तोल गेल्यासारखें होतें, पण दाराची चौकट घट्ट धरून ते स्वतःला सावरतात. दिवाकर दाराकडे धावतो. तो आणि दया त्यांना धरून आंत नेतात. बाबासाहेबाकडे रोखून पाहात जाधव निश्चल उभा आहे. ते दिसेनासे झाल्यावर तो निघून जातो. ]

**कुळकर्णी** : (मानेच्या जवळ येऊन) मला अगदी सुटल्यासारखं वाटतय्, माने. पण झाला हा प्रकार पाहवेना आपल्याच्यानें! (तो रुमालानें कपाळावरचा घाम पुसतो. असल्या प्रसंगाना निर्ढावलेला माने घाबऱ्या-घुबऱ्या झालेल्या कुळकर्ण्याकडे औपरोधिक स्मित करीत पाहतो.) एका-पेक्षा एक भयकर प्रसंग घडत होते. दोघाचेहि गळे कापले गेले, या जाधवाच्या म्हणण्याचा अर्थ काय बुवा? तिकडे बायको मरून पडलेली, पण याच्या तोडाचा पट्टा पहिल्यासारखाच चेअरमनसाहेबाविरुद्ध चालला होता.

**माने** : (अर्धवट स्वतःशी) गेल्या सहा महिन्यातल्या सगळ्या बेरजा-वजा-बाक्या केल्यानतर शिल्लक काय, तर एक निरपराध स्त्री जमीनदोस्त आणि दोन श्रेष्ठ पुरुष उद्ध्वस्त!

[ दारात देशमुख येऊन उभे आहेत ]

**कुळकर्णी** : (कागद गोळा करता करता तो मान्याकडे पाहतो आहे. एकदम शोध लागल्यासारख्या आवाजात) एक गोष्ट तुमच्या लक्षात आली का माने? सप सुरू झाला तेव्हा अगदीं हाच तडजोडीचा मसुदा तुमच्या फेडरेशनच्या ऑफिसात तुम्हीं नि मी मिळून तयार केला होता. दोन्ही बाजूना तो दाखवला होता. मग—मग हे सर्व—हे सर्व भयकर झाल हे कशाकरिता?

**माने** : (एक एक शब्द मोजीत, गभीरपणे) हीच-तर-मौज-आहे!

[देशमुख दारांतूनच 'बरोबर आहे' अशा अर्थानें मान हलवतात तोच पडद पडतो ]

# काणेकरांची पुस्तकें

१ चांदरात व इतर कविता
२ रुपेरी वाळू (गद्यकाव्य)
३ पिकलीं पानें (लघुनिबंध)
४ तुटलेले तारे ( ,, )
५ शिंपले आणि मोती ( ,, )
६ उघड्या खिडक्या ( ,, )
७ जागत्या छाया (लघुकथा)
८ दिव्यावरती अंधेर ( ,, )
९ मोरपिसें ( ,, )
१० काळी मेहुणी व इतर गोष्टी (लघुकथा)
११ घरकुल ( नाटक )
१२ निशिकांताची नवरी ( ,, )
१३ फांस ( ,, )
१४ पतंगाची दोरी ( ,, )
१५ धूर (एकाकिका)
१६ राखेंतले निखारे ( ,, )
१७ हिरवे कंदील (सकीर्ण लेख)
१८ रसेलनिती ( चर्चालेख )
१९ धुक्यांतून लालताऱ्याकडे ( प्रवास वर्णन )
२० आमची माती, आमचें आकाश ( प्रवास वर्णन )
२१ झुंज (नाटक)



## आगामी

२२ निळे डोंगर, तांबडी माती (प्रवासवर्णन)
२३ पांढरीं शिडें (लघुनिबंध)
२४ अंधारांतल्या मशाली (लेखसंग्रह)
२५ बोलके ढलपे ( ,, )
२६ काळोख (एकाकिका)